**अपढ** – वि मूर्ख अशिक्षित
**अपत** – वि पाने झडलेले निर्लज्ज
**अपदस्थ** – वि. पदच्युत वियुक्त
**अपनपा** – पु आपलेपणा अहकार
अपन पेट हाउड मैं न देहौं काऊ–
नीच स्वार्थ आपल्यापुरते पाहणे
**अपना** – वि आपले स्वत चे
– पु स्वजन
**– किया पाना** – कर्माचे फळ भोगणे
**– पराया** – शत्रुमित्र आपपर
**– राग आलापना** – आपले घोडे दामटणे
**– सा मुँह** – इवलेसे तोड खिन्नता
**अपनी अपनी पडना** – आपलेच झाले थोडे चिंताग्रस्त होणे
**अपनी खिचडी अलग पकाना** – फुटीरपणे वागणे चिंताग्रस्त होणे
**अपनी गाना** – आपलेच रडगाणे गाणे
**अपनी अपनी डफली अपना अपना राग**– कोणाचा पायपोस कोणाच्या पायात नसणे
**अपनी गुडिया सँवार देना** – आपल्या सामर्थ्याप्रमाणे मुलीचे लग्न करणे
**अपनी नींद सोना** – लहरीने वागणे
**अपनी बात का एक (धनी)** – सत्यप्रतिज्ञ
**अपनी पर आना** – अडून बसणे
**अपनी हाँकना** – शेखी मिरविणे
**अपने आप** – स्वत आपोआप
**अपने को मरना** – आपल्या माणसासाठी धडपडणे
**अपने तक रखना** – आपल्या पोटात ठेवणे
**अपनेपन पर आना** – जातीवर जाणे
**अपने भायें** – आपल्या कल्पनेप्रमाणे
**अपने मे रहना** – मर्यादित वागणे
**अपने मुँह मियाँ मिठ्ठू** – आपणच आपली स्तुति करणारा
**अपनाना** – क्रि स वश करणे अगीकार करणे अभिमान बाळगणे
**अपनापन** – पु } आत्मीयता.
**अपनायत** – स्त्री }
**अपनोद में** – बाजूला सारण्यात.
**अपभय** – पु. निर्भय

**अपरति** – स्त्री स्वार्थ विश्वासघातकीपणा.
**अपरबल** – वि बलवान् उद्धत प्रचड दुसऱ्याच्या सामर्थ्यावर आश्रित ज्याला दुसऱ्याचे बळ किंवा आधार नाही असा.
उ "दसो दिसा ते क्रोध की
उठी अपरबल आगी"
**अपरस** – पु पुळ्या उठण्याचा रोग अस्पृश्य एक चर्मरोग
**अपरांत** – पु दुसरे टोक
**अपरान्त** – पु पश्चिमेचा देश
**अपवर्ग** – पु मोक्ष श्रेष्ठगति
**अपसव्य** – पु उजवा विरुद्ध
**अपसर्प** – पु दूत भेदी प्रतिनिधि
**(अपहसित)** – वि फजिती केला गेलेला.
**अपरिग्रह** – पु दान न घेणे जरूर तेवढ्या धनापेक्षा अधिक न बाळगणे
**अपाहिज** – वि लुळापागळा असमर्थ. आळशी
**अपूत** – वि अपवित्र निपुत्रिक
– पु कुपुत्र
**अपूप** – पु अनरसा मालपुआ
**अपेक्षा** – स्त्री आकाक्षा, आवश्यकता भरवसा अन्योन्य सबध तुलना ("की अपेक्षा"–असे वापरावे ) अपेक्षा
**अपेल** – वि अदृश्य अटळ पक्का
उ "यह सिद्धान्त अपेल"
**अपेक्षाकृत** – अपेक्षेप्रमाणे अपेक्षित
**अप्रतिभ** – उदास तेजोहीन मद निर्बुद्ध.
**अप्रत्याशित** – वि अनपेक्षित
**अप्रैल** – पु एप्रिल (अपरैल)
**अफजल** – अ वि सर्वश्रेष्ठ [वीट येणे.
**अफरना** – क्रि. अ ताव मारणे. पोट फुगणे.
**अफरा** – पु पोटफुगी
–वि ज्याने खूप तुडपले आहे असा.
**अफरातफरी** – अ स्त्री उलटापालट
**अफरीदी**–पु पेशावरच्या उत्तरेकडील एक पठाणजाति या जातीतील व्यक्ति
**अफलातून** – अ पु अहमन्य प्लेटो (एक तत्त्ववेत्ता)
**अफवाह** – अ स्त्री. गप्प. अफवा

**अफ़वाह उडाना** — अफवा पसरविणे
**अफसर** — फा पु अधिकारी
**अफसाना** — फा पु गोष्ट कहाणी
**अफसोस** — फा स्त्री खेद पश्चात्ताप
**अफीम** — यू स्त्री अफू
**अफीमची** — पु अफूबाज माणूस अफीमी
**अफेंडा** — वि अहकारी विलासी
**अब** — क्रि वि आता यावेळी अलीकडे. त्यानतर
**अब की** — यापुढें
**अब जाकर** — आता पुढे
**अबतब लगना** — शेवटला श्वास लागणे
**अबतर** — फा वि वाईट विघडलेले
**अब से** — यापुढे
**अबरक** — पु } अभ्रक
**अबरख** — पु }
**अबरस** — फा पु पाढरट हिरवा रग (घोड्याचा)
**अबरी** — फा स्त्री नागमोडी रेषा असलेला वावणीत वापरण्याचा गुळगुळीत कागद जैसलमीर येथे सापडणारा नकशी-कामात उपयोगी पिवळा दगड खडी काढण्याचा लाखी रग
**अबलख** — वि पाढऱ्या नि काळ्या रगाचा. पाढरा नी लाल रगाचा दुरगी —पु पाढऱ्या नी काळ्या रगाचा घोडा किंवा बैल
**अबलखा** — स्त्री एक पक्षी (रग काळा, पोट पाढरे, चोच नारगी)
**अबा**—पु सहा कळ्यांचा पायघोळ आगरखा
**अबातुल** — वि वडवड न करणारा
**अबादानी** — स्त्री (फा )पूर्ण सुख अभीष्ट-चिंतन
**अबीर** — पु शिगाड्याचे पीठ हळद नी चुना मिसळून केलेले द्रव्य अबीर
**अबे** — अव्यय अरे !
**अबे-तबे करना** — टाकून बोलणे
**अबेर-अबार** — स्त्री उशीर विलब
**अब्वास** — अ पु गुलवासी वासहीन फूल
**अब्वासी** — अ स्त्री इजिप्तच्या (मिश्र-देशाच्या) कापसाची एक जात

**अब्र** — फा स पु अभ्र मेघ
**अभग** — वि अखड.
**अबूझ** — वि अजाण
**अबोध** — वि अजाण अज्ञानी मूर्ख
(**अबोल** — वि मौन )
(**अबोला** — पु मौन )
**अभागा** — वि सपत्तीच्या वाटणीत ज्याचा हक्क नाही असा अभागी
**अभरन**—पु दागिना "निरभरन कैसे जाऊं"
**अभिजात** — वि कुलीन पूज्य बुद्धिमान्
**अभिरुचि** — स्त्री आस्वाद पसती रसज्ञान.
**अभिरूप** — वि अनुरूप विद्वान् कामदेव सदृश
**अभिषग** — पु पराजय निंदा आलिंगन शोक भूतप्रेताचा आवेश
**अभिक** — पु कामुक लुच्चा व्यभिचार
**अभिनदन-पत्र** — पु मानपत्र
**अभिनीत**—वि सुसज्जित अभिनय केलेले रगभूमीवर आणलेले
**अभिनेता** — पु नट
**अभिनेत्री** — स्त्री नटी
**अभिन्न** — वि. जुळलेले एकजीव झालेले
**अभिन्नमित्र** — पु जिवलग मित्र
**अभिप्राय** — पु हेतु तात्पर्य
**अभिभावक** — पु विश्वस्त वि स्तभित करणारे दावात ठेवणारा
**अभिभूत** — वि पराजित प्रभावित वश. व्याकुल
**अभियान** — पु प्रयाण कूच
**अभियुक्त** — वि आरोपी प्रतिवादी
**अभियोग** — पु आरोप खटला चढाई छद
**अभिव्यक्ति** — स्त्री प्रकटीकरण स्पष्टी-करण.
**अभिष्यंद** — पु पाझर स्राव
**अभिसधि** — स्त्री वचना गुप्त कट
**अभी** — क्रि वि आताच या क्षणी
**अभीर** — पु गवळी एक क्षत्रिय जात ११ मात्राचा एक छद.
**अभीष्ट** — वि. मनपसत अभिप्रेत
**अभूतपूर्व** — वि अपूर्व विलक्षण.

**अभेरा** – पु टक्कर झगडा.
"उठे आगि दोड डारि अभेरा"
**अभेव** – पु अभेद समानता [काठी.
**अभैर** – पु मागाची फणी लटकविण्याची
**अभ्यर्थना** – स्त्री विनती स्वागत
**अभ्यागत** – वि पुढे आलेला
– पु पाहुणा. अतिथि
**अभ्यास** – पु सवय अध्ययन अभ्यास.
**अभ्यास पडना** – सवय लागणे
**अभ्यासी** – वि दक्ष निपुण साधक
**अभ्युत्थान** – पु आरभ उदग उत्पत्ति.
**अमंद** – पु झाड
– वि वेगवान. उत्तम. कार्यकुशल
"चदसो दुचद है अनदमुख एक"
"प्रेमिनके नभमे नक्षत्र हैं न तारे है"
**अमचर** – पु आवोशी
**अमडा** – पु आवळ्याचे झाड आवळा
**अमन** – अ पु शातता चैन
**अमनचैन** – (अरमान)–पु सुखशाति
**अमनअमनेक** – पु हक्कदार अधिकारी (अवध प्रातात)
**अमया** – वि निर्दय मायामोहरहित
**अमरवधूटी** – स्त्री अप्सरा.
**अमरस** – पु आव्याची पोळी
**अमरसी** – वि आवट-गोड क्रोध नसलेला.
**अमरा** – स्त्री दूर्वा निवडुग. काडेसाबर. गर्भावरण (नाळ) उल्व.
**अमराई** – स्त्री आवराई
**अमरू** – पु काशीचे रेशमी कापड
एक राजा व कवीचे नाव
श्रीशकराचार्यांनी अमरूराजाच्या शरीरात प्रवेश करून "अमरूशतक" नावाचे काव्य लिहिले
**अमरूद** – पु जाव पेरू
**अमरैय्या** – स्त्री आमराई
"कहिबी कि अमरैय्या राम राम कही है"
**अमल** – वि स्वच्छ. निर्मल [सवय
– पु व्यवहार आचरण दैव भोगकाल
"हरिदरसन अमल पऱ्यो लाज न लजा न
"अमल चलायो आपुनो मुदली गरजि गुमान"

**अमलतास** – पु बाहवा (एक झाड. याच्या फुलाचा गुलकद करतात).
**अमलतासिया** – वि गधकी (रग).
**अमलपट्टा** – पु अधिकारपत्र
**अमला** – पु आवळा
अ पु अधिकारी कारकून
**अमलाफैला** – पु कचेरीतला नोकरवर्ग.
**अमली** – स्त्री. चिच. दक्षिण गढवाल-मधील एक झुपकेदार झाड
अ वि व्यावहारिक निशावाज
**अमलूक** – पु एक कावुली झाड
**अमलोनी** – स्त्री लुनिया गवत निळवा
**अमहर** – स्त्री आवोशी
**अमा** – स्त्री अमावास्या जनावराच्या डोळ्यावरील भवरी (अशुभ)
**अमान** – अ पु रक्षण आश्रय
**अमानत** – अ स्त्री अनामत ठेव
**अमाना** – क्रि अ मावणे फुगणे (गर्वाने). ओसडणे.
– पु वखारीचे दार
**अमानी** – स्त्री जमीनदाराच्या ताब्यातील कलेक्टरकडे असलेली भूमि स्वत केलेले शेत तहकुबी किंवा काही सूट दिलेल्या साऱ्याची वसुली अदाधुदी
वि निराभिमानी
**अमाप** – वि अपरिमित
**अमावट** – स्त्री आव्याची पोळी एक मासा
**अम्लजन** – पु प्राणवायु ऑक्सिजन
**अमाल** – अ पु अमलदार अधिकारी.
– अ पु अधिकाऱ्याची दैनदिनी
चित्रगुप्ताची वही
**अमावस** – स्त्री अमावास्या.
**अमाह** – पु वडस (डोळ्यावरील)
**अमिट** – वि अवश्यभावी कायमचे. नाश न पावणारे
**अमित** – वि पुष्कळ अपरिमित
"अमितदानि भरता वैदेही"
**अमित्र (अमीत)** – पु वैरी
"पावकतुल्य अमीतनको भयो"
**अमिताभ** – पु बुद्धदेव
**अमिया** – स्त्री वैरी

**अमिरती (इम्रती)** – स्त्री. एक प्रकारची तोडयाप्रमाणे जिलबी
**अमिलपट्टी** – स्त्री रुद पट्टीची मुरड
**अमीन** – अ पु जमीन मोजणे, वाटप करणे, दरखास्तीची बजावणी करणे, इ कामे करणारा मुलकी अधिकारी
**अमीर** – अ पु श्रीमत उदार अधिकारी अफगाणिस्तानच्या राजाची पदवी
**अमीराना** – अ वि श्रीमती (राहणी)
**अमीरी** – अ वि श्रीमती (थाट) – स्त्री श्रीमती
**अमृतबान** – पु लाखलोटे
**अमृततरंगिणी** – स्त्री चादणीरात्र
**अमृतफल** – पु. पडवळ
**अमृतसार** – पु द्राक्ष लोणी
**अमूद** – पु लव उभी सरळ रेषा
**अमोघ** – वि अचूक निष्फळ न होणारे
**अमोरी** – स्त्री कैरी
**अमोला** – पु आव्याचे रोप
**अमोही** – वि विरक्त निष्ठुर
**अमौवा** – वि आव्यासारख्या रगाचा (पिवळा सोनेरी)
**अम्माँ** – स्त्री आई
**अम्मामा** – अ पु एक प्रकारचा फेटा – अ पु मुलेवाळे
**अम्हौरी** – स्त्री घामोळे
**अम्हौरी लगाना** – बजावणे प्रेरणा करणे.
**अयाँ** – अ वि प्रकट स्पष्ट
**अयान** – वि मूर्ख अज्ञान
**अयानत** – अ स्त्री सहायता मदत
**अयाल** – न् स्त्री आयाळ
**अय्यार** – वि चतुर बहुरूपी
**अयि** – अव्यय सबोधनार्थी हे अरे !
**अरंक** – वि सपन्न
**अरग** – पु सुगध
**अरच** – वि पुष्कळ
**अरज** – वि. दु ख नसलेला.
**अरई** – स्त्री पराणी चाबूक
**अरक** – पु शेवरी आसव रस घाम – **अरक होना** – घामाघूम होणे.

**अरक** – पु सूर्य
"अरक जवाम पात विनमयऊ"
**अरकटी** – पु सुकाणू फिरविणारा नावाडी.
**अरकना** – क्रि अ टरकणे तडकणे
**अरकनाना** – अ पु पुदिना नि मिरका मिसळून काढलेला अर्क
**अरकान** – अ पु मत्रीवर्ग
उ "नेगी गये मिले अरकाना"
**अरकाटी** – पु श्रमिक (मजूर) मजुराची भरती करून बाहेर प्रातात पाठविणारा
**अरकोल** – पु एक वृक्ष (याच्या डिकाला काकडशिंगी म्हणतात)
**अरग** – पु } एक सुगधी द्रव्य.
**अरगजा** – } अर्गजा
केशर, चदन, कापूर आदि सुगधी द्रव्याचे उटणे
"खरको कहाँ अरगजा लेपन स्वान नहाये गग"
**अरगट** – वि निराळा वेगळा
उ "अरगटही फानूमसी परगट होति लखाय"
**अरगनी** – स्त्री दाडी (वाळत घालण्याची) खुटाळे
**अरगवानी** – फा पु लाल रग –वि तावडा वेगणी
**अरगल** – पु अडसर [निवडणे.
**अरगाना** – क्रि अ चुप बसणे अलग होणे.
**(प्राण) अरगाना** – चकित होणे.
उ "देस देसके नृपति देखि यह प्राण रहे अरगाई"
**अरघा** – पु अर्घ्यपात्र रहाट
**अरच** – वि पुष्कळ
**अरज** – अ स्त्री विनति निवेदन
**अरजल** – अ पु पुढील उजवा नि मागील दोन्ही पाय पाढरे असलेला घोडा (अपशकुनी) नीच जातीचा मनुष्य. वर्णसकर.
**अरजी** – स्त्री. निवेदन प्रार्थनापत्र.
उ "गरजी है अरजी करी टुक मरजी करि देहू"

**अरझना** — क्रि अ गुंतणे पेचांत आवळले जाणे
उ "कुछ अरझानी है करीरनिकी डामैं"
**अरडींग** — वि बलवान
**अरणा** — स्त्री. जगली म्हैस. [करणे
**अरथाना** — क्रि स समजाविणे समर्थन
उ 'दसरथ-वचन राम वन गवने यह कहियो अरथाई"
**अरथी** — (अर्थी) स्त्री तिरडी प्रेतयात्रा
—पु मतलबी. धनी
"अर्थी दोषात्र पश्यति"
**अरदना** — क्रि स चेदणे चिरडणे
वि दात नसलेली स्त्री
(तोडाचे बोळके)
**अरदल** — पु लकेतील एक वृक्ष
**अरदली** — इ. पु ऑर्डर्ली अधिकाऱ्याच्या तैनातीचा शिपाई
**अरदावा** — पु भरडा जाडेंभरडे पीठ भरीत
"नख ते बघारि कीन्ह अरदावा"
**अरदास** — स्त्री प्रार्थना नजराणा
"यह अरदास दास की सुनिये"
**अरन** — पु दोन्हीकडे टोके असलेली शिडी
**अरना** — पु जगली रेडा
**अरनी** — स्त्री शमीवृक्ष अग्निमथन काष्ठ (यज्ञांत)
"कहा कहौं कपि कहत न आवै सुमिरत प्रीति होइ उर अरनी"
**अरपा** — पु एक मसाला
**अरब** — पु शतकोटी अर्ब. घोडा इद्र.
**अरब** — अ पु अरबस्तान अरबी घोडा. अरबी मनुष्य
**अरबराना** — क्रि अ चालताना लटपटणे. घाबरणे व्याकुळ होणे
**अरबरी** — स्त्री घबराट व्याकुळता
**अरबिस्तान** — फा पु अरब देश
**अरबी** — स्त्री अरबी भाषा
— वि अरब देशाचा.
**अरबीला** — वि. भोळा
**अरमनी** — फा पु आरमेनियावासी. कॉकेशसच्या दक्षिणेकडील प्रदेश.
**अरमान** — तु पु इच्छा. लालसा.
**अरमान निकालना** — इच्छा पूर्ण करणे. मनासारखे करणे
**अरमान भरा** — वि उत्सुक.
**अरर** — अव्यय अरेरे ! !
—पु दार झाकण [होणे.
**अरराना** — क्रि स उन्मळणे कडकडध्वनि
**अरवन** — पु कच्चे पीक कापणे (निबूर, हुरडा इ ) [कोपरा.
**अरवा** — पु हातसडीचे तादूळ कोनाडा
**अरवाती** — स्त्री छपराचे शेवटचे पऱ्हाळ (जेथून पाणी जाते ते)
**अरवी** — पु अळू अळूचा कादा
**अरसठ** — पु मासिक खतावणी.
**अरस-परस** — पु लपडाव
**अरसना-परसना** — क्रि स आलिगन देणे भेटणे [उशीर
**अरसा** — अ पु काळ (मध्यतरीचा).
**अरसात** — पु २४ अक्षरी सवाई वृत्त. या वृत्तात ७ **भगण** व एक **रगण** असतो
**अरसाना** — क्रि अ सुस्ती चढणे
उ "आरसगात मरे आरसात है"
**अरस्तू** — पु ॲरिस्टॉटल
**अरहट** — पु पाण्याचे चाक कणा
**अरहन** — पु भाजीत घातलेले व्यजन (पीठ कूट इ )
**अरहर** — स्त्री तूर (डाळीची)
**अरा** — पु लाकूड कापण्याची करवत.
**अराक** — अ तु इराक प्रात इराकी घोडा.
**अराड जाना** — क्रि स विणे
**अराळ** — वि कुरळे (केस) वाकडे
**अराबा** — अ पु गाडी रथ जहाजी तोफाची सरबत्ती
**अरिज** — पु पाढरी वाभूळ
**अरियल** — वि अडून बसणारा
**अरी** — अव्यय अग !
**अरीठा** — पु रिठा
**अरीता** — वि काठोकाठ भरलेला.
**अरीला** — वि दुराग्रही हट्टी.

अरुझाना – क्रि स अडकविणे लपेटणें
अरुणाई } अरुणिमा } – स्त्री. तांबूसपणा लाली
अरुवा – पु अळूकंद घुवड
अरुहा – पु मुई आवळा.
अरेव – पु पाप
अरेरा – पु टक्कर संघर्ष
अरोडा – पु पंजाबी क्षत्रियजात (अरोरा).
अरोस – वि क्रोधरहित
अरोस-परोस – शेजारी-पाजारी
अरोही – पु. सवार
अर्की (अर्कि) – पु. शनि.
अर्गल – पु. अडसर झडप. अडथळा. उदयास्ताचे रंगीबेरंगी ढग
अर्गला – स्त्री अडसर
अर्ज – अ पु "अरज" पहा
अर्जदास्त – फा स्त्री. विनति-पत्र
अर्जी – फा स्त्री 'अरज' पहा.
अर्जीदावा – स्त्री दरखास्त
अर्जीमरम्मत – स्त्री. पुरशिस दरखास्त
अर्जुनी – स्त्री पांढऱ्या रंगाची गाय
अर्थवाद – पु प्रशंसा. प्ररोचक वाक्य
अर्थात् – अव्यय–म्हणजे. ऊर्फ अर्थातच.
अर्दली – पु चपराशी
अर्धचंद्र – पु गचांडी चंद्रबिंदू.
अर्धोदय – पु एक पर्वणी (माघ व ।। ३० रविवार श्रवणनक्षत्र व व्यतिपात-योग असताना हे पर्व असते.)
अर्रा – पु अर्जुन वृक्षासारखें एक झाड
अर्श – पु. मूळव्याध
– अ पु आकाश स्वर्ग.
अर्हणा – स्त्री. पूजा
अर्हंत – पु जैनांचा जिन देव वृद्ध.
अलंग – अव्यय कडे, दिशा
"लैन आयो कान्ह कोऊ मथुराअलगते"
अलकतरा – अ पु डांबर
अलक लडैता – वि. लाडका.
"अब मेरे अलक लडैते
लालन हैं है करत सकोच"
अलख – वि न दिसणारा. अदृश्य
अलख जगाना – खड्या आवाजात "अलख" म्हणून भिक्षा मागणे
अलखनामी } अलखवारी } पु साधूंचा एक पंथ.
अलखला – अ पु झगा
अलग – वि निराळे दूर
अलग करना – बाजूला सारणे, हाता-वेगळें करणे, राखून ठेवणे.
अलगनी – स्त्री. दांडी, खुंटाळे
अलगरज – वि बेपर्वा.
अलगाना – क्रि स वेगळे करणे, दूर करणे, निवडणे. [विभक्तता.
अलगाव – पु दूर राहण्याची वृत्ति.
अलगोला – अ पु अलगूज
अलड़-बलड़ – वि वाचाळ मूर्ख
अलतनी – स्त्री हत्तीचा लगाम.
अलप – पु अकाली मृत्युयोग
उ "तू अति चपलअलप को संगी"
अलपाका – पु अलपाकाचे कापड अल-पाक लोकर उंटासारखा पेरु देशाचा एक प्राणी [कफनी
अलफा – अ पु मुसलमानी पायघोळ
अलफाज़ – अ. पु. शब्द ('लफ्ज़'चे बहुवचन)
अलबत्ता – अ अव्यय निःसंशय हो चांगले अलबत् परंतु बरोबर
उ "फैशन का लत्ता अलबत्ता फहराता है"
अलबम – फा पु चित्रपुस्तक
अलविदा – अ पु शेवटचा निरोप.
अलबेला – वि शोकी नटलेला थटलेला. सुंदर अल्लड लहरी, कठिण (स्त्री. अलबेली)
"नायिका न बेली अलबेली खेली नैहर सो"
अलबेला धरी रहना – संताप निष्फळ होणे.
अललटप्पू – वि वात्रट बिनहिशेब.
अललबछेडा – पु शिंगरू अल्लड माणूस अननुभवी.
अलवाँती – स्त्री बाळंतीण

**अलवाई** — स्त्री. विऊन एक-दोन महिने झालेली गाय किंवा म्हैस
**अलवात** — पु लोकरीची शाल.
**अलवान** — पु लोकरीची चादर (थडीत पांघरण्यासाठी)
**अलवी-तलवी** — पु क्लिष्ट उर्दू (व्यंग)
**अलवी-तलवी छांटना** — पांडित्य गाजविणे
**अलवी-तलवी धरी रहना** — ऐटी जिरणे
**अलस** — वि सुस्त मंद
— पु चिखली (पायाची)
**अलसा** — स्त्री. लाजाळूची वेल
**अलसाना** — क्रि अ आळसणे गळून जाणे.
**अलसी** — स्त्री आळशी
**अलसेठ** — स्त्री ढिलाई दुर्लक्ष
**अलहदा** — अ वि वेगळा
**अलहिला** — स्त्री एक रागिणी (करुणा-जनक)
**अलहैरी** — अ पु एक अरबी उंट (एकच कुबड असून वेगवान असतो)
**अलान** — पु हत्तीला बांधण्याचा खुंटा बैलाला चारण्यासाठी गाडलेला खुंटा "नवगयन्द रघुवीरमन राज अलान समान"
**अलानिया** — क्रि वि (अ एलान) स्पष्टपणे, जाहीरपणे.
**अलापनहार** — वि गाणारा "अहि कराल कैकी भर्ष" "मधुर अलापन हार"
**अलापना** — क्रि अ गाणे आलाप घेणे. वडवडणे
**अलामत** — स्त्री लक्षण चिन्ह
**अलाय-बलाय** — स्त्री मकट, खराबी.
**अलालत** — स्त्री आजार
**अलाली** — स्त्री आळस आकर्मण्यता
**अलाली आना** — (चढना. सँवार होना) सुस्ती येणे
**अलाव** — पु आहाळ झगरें आवा
**अलावा** — अ क्रि वि खेरीज
— इसके — दुसरे असे की
**अलास** — पु जिभेखालील भाग सुज-ण्याचा रोग मलयुक्त आतडें
**अलिंजर** — पु माठ घडा
**अलिंद** — पु सज्जा
**अलि** — पु भुंगा
**अलील** — अ वि आजारी
**अलुन** — वि मीठ नसलेले न कापलेले
**अलैक पलवा** — पु मिथ्यावाद प्रलाप बकवाद.
**अलैया-बलैया** — स्त्री ओवाळून टाकण्याची क्रिया इडापिडा टाळण्यासाठी बोटे मोडणे एक खेळ
**अलोना** — वि अळणी, फिक्के
**अलोल** — वि स्थिर दृढ
**अल्ल** — पु वंशाचे नाव उपगोत्राचे नाव उ पाण्डे, शुक्ल
**अल्हड** — वि अल्लड निर्घोर लहरी अनुभवी अडाणी
पु गोऱ्हा
**अल्हडपन** — पु अल्लडपणा, पोरकटपणा भोळेपणा
**अवंतिका** — स्त्री प्राचीन उज्जयिनी
**अवकलना** — क्रि स कळणे, सुचणे
**अवकाश** — पु पोकळी मोकळीक संधि स्थान सुट्टी, रजा
**अवकेशी** — वि पुत्रहीन वाझ
**अवगति** — स्त्री जाणीव समज
**अवगाह** — वि अगाध
उ "तिमि रघुपति महिमा अवगाहा"
पु — बुडी, प्रवेश, कष्ट
**अवगाहना** — क्रि अ स्नान करणे खोल शिरणे. मथन करणे "दिसि विदिसन अवगहि कै" सुख हो केशवदास"
**अवगुण** — पु दोष, अवगुण, अपराध
**अवघट** — वि विकट, अवघड
**अवचट** — पु अडचण
— वि अडाणी नवखा
**अवछद** — पु माडी [अर्थालंकार
**अवज्ञा** — स्त्री निराधार अवहेलना एक
**अवज्ञात** — वि. अपमानित तिरस्कृत
**अवट** — पु खड्डा, कुंड, खाकोटी
**अवटना** — क्रि स आठवणे मथन करणे

**अवडेर** – पु फेरा वखेडा. झेगट.
**अवढर** – वि नीचावरही उपकार करणारा विचार न करता दया करणारा अत्यत दयाळू
**अवतस** – पु भूषण श्रेष्ठ कर्णफूल. नवरदेव
**अवतरण** – पु. उतार अवतार, शिडी
**अवतार** – पु शरीर धारण, अवतार
**अवतारना** – क्रि स उत्पन्न करणे, जन्म देणे
**अवदशा** – स्त्री दुर्दशा
**अवदात** – वि निर्मल, शुद्ध, पाढरे
**अवदीच्य** – वि एक गुजराथी ब्राह्मण
**अवधान** – पु लक्ष, ध्यान [करणे
**अवधारना** – क्रि स ऐकणे मानणे धारण
**अवधि** – स्त्री वेळ, मर्यादा
—अव्यय— पर्यंत
**अवधी** – वि अवध प्राताचे
अवधी भाषा (तुलसी रामायणाची)
**अवधूत** – पु सन्यासी, योगी
**अवनि** }
**अवनी** } – स्त्री पृथ्वी, भूमि
**अवनी पखनी** – स्त्री राजपत्नी
**अवभृथ** – पु यज्ञसमाप्तीच्या वेळी करण्याचे स्नान
**अवमान** – पु अपमान तिरस्कार
**अवराधना** – क्रि स पूजा करणे
**अवरेखना** – क्रि स लिहिणे चितारणे पाहणे, अनुमान करणे
**अवरेब** – पु तिरपी चाल, तिरपाकाट पेच, विघाड, विवाद, वक्रोक्ति.
उ "ध्वनि अवरेब कवित गुन जाती"
**अवरोध** – पु अडचण, अडथळा, अत पुर
– क्रि स वद करणे, अडविणे
"कठावरोधनविधौ स्मरण कुतस्ते"
**अवर्ण्य** – वि अवर्णनीय
**अवलंब** }
**अवलबन** } – पु. आधार, आश्रय
**अवलेप** – पु घमेड अहकार
**अवलेह** – पु चाटण
**अवशेष** – पु उरलेले, बाकीचे
**अवश्यंभावी** – वि. अटळ, नि सशय. निश्चितपणे घडणारे
**अवश्य** – क्रि वि नि.सशय, खात्रीने.
**अवसर** – पु काळ, फुरसत, प्रसग, सधि.
**– चूकना** – सधि दवडणे
**– ताकना** – सधीची वाट पाहणे
**– देखना** – योग्य सधि पाहणे
**– पडना** – वाईट प्रसग गुदरणे
"परे अवसर के साई"
**– मारा जाना** – सधि निघून जाणे.
**अवसर-वाद** – पु ईश्वरच कर्ता आणि ज्ञाता आहे असा सिद्धान्त (यहुदी-लोकाचा) सधिसाधूपणा
**अवसर-वादी** – वि सधिसाधू
**अवसाद** – पु विषाद शिथिलता
**अवसान** – पु शेवट, सीमा, विराम
**अवसी** – स्त्री नवधान्य. ताजें कणीस
**अवसेर**–(**अवसेरी**) स्त्री अडथळा, उशीर चिंता अस्वस्थता.
उ "गये बहुत दिन अति अवसेरी"
**अवस्था** – स्त्री वय. दशा, स्थिति
**अवस्थाता** – पु अधिष्ठाता प्रधान, प्रमुख.
**अवस्थान** – पु अस्तित्व, ठिकाण.
**अवस्थी** – पु "अवस्था" नावाचा एक विशेष प्रकारचा यज्ञ करणारा. ब्राह्मणातील एक पोटजात
**अवही** – पु एक प्रकारची वाभूळ
**अवाँ** (**अवा**) – पु भट्टी "तपइ अवाँ इव उर अधिकाई"
**अवाई** – स्त्री आगमन खोल नागरट.
**अवाक्** – वि चूप मौन चकित स्तब्ध
**अवाज** – स्त्री ध्वनि शब्द.
**अवार** – पु जवळचा किनारा अल्याड
**अवारजा** – फा पु खातेवही नोदवही
**अविथा** – वि व्यथा नसलेला
**अविनय** – पु उद्धटपणा.
**अविहड़** – वि अखड नाश न होणारा.
**अवीरा** – वि. पति व पुत्र नसलेली स्त्री. स्वच्छद स्त्री
**अवेर** – क्रि वि. उशीर. विलब.

**अवैतनिक** — वि वेतन न घेता काम करणारा विनपगारी
**अवैध** — वि नियमाविरुद्ध बेकायदा
**अव्वल** — अ वि पहिला प्रारंभीचा उत्तम.
**अशरफ** — अ वि सज्जन [गुलवाक्षी
**अशरफी** — फा स्त्री मोहोर पिवळी
**अशान्ति** — स्त्री खळवळ क्षोम, असतोप
**अशुचि** — वि अपवित्र घाणेरडे
**अश्क** — फा पु अश्रु.
**अश्म** — पु दगड पर्वत मेघ
**अश्मकुट्ट** — पु दगडाने कुटून अन्न खाणारे. वानप्रस्थ विशिष्ट लोक
**अश्लील** — वि असभ्य लज्जाजनक अधम अल्लड बोजड.
**अष्टछाप** — सूर, कृष्ण, परमानद, कुभन हे चार वल्लभशिष्य आणि नददास, चतुर्भुज, गोविंदस्वामी, छीतस्वामी हे विठ्ठलनाथाचे शिष्य या आठानी व्रज भाषेत कृष्णभक्तिपर उत्तमोत्तम काव्याची निर्मिति केली म्हणून या आठ सताना अष्टछाप कवि म्हणतात
**अष्टीला** — स्त्री मुतखडा
**असभव** — वि अशक्य
**असकन्ना** — पु म्यान स्वच्छ करण्याचे लोखडी हत्यार
**असगंध** — पु ढोरगुज अश्वगधा
**असगुन** — पु अपशकुन
**असढिया** — पु पाठीवर ठिपके असलेला एक लाब साप (निर्विष असतो)
**असन** — पु भोजन
"मुदित सुअसन पाइ जिमि भूखा"
**असभ्य** — वि न सुधारलेला जगली. अशिष्ट [अडचण
**असमंजस** — पु बुचकळा घोटाळा फेरा
**—में पडना**—घोटाळ्यात पडणे दुग्ध्यात पडणे
**असमत** — पु चूल
**असवर्ग** — फा पु खुरासानचे उच गवत याची फुले वाळवून हिंदुस्थानात पाठवितात (रेशीम रगविण्यास उपयोगी)
**असबाब** — अ पु वस्तु. सामान.
**असम** — वि खडवडीत. सारखे नसलेले. विषम.
**असम्मत** — वि अमान्य पडलेला (ठराव).
**असर** — अ पु प्रभाव परिणाम चौथा प्रहर (दिवसाचा)
**असरा** — पु आसामाचा तादूळ
**असल** — अ वि खरे शुद्ध मूळचे.
— पु मूळतत्त्व मुद्दल
**असलियत** — अ स्त्री तथ्य मूळ वस्तुस्थिति
**असली** — अ वि शुद्ध महत्त्वाचे मूळचे
**असाढ** — पु आषाढ महिना
**असाढा** — पु बारीक रेशीम कच्ची चीनी (साखर)
**असाधारण** — वि असामान्य आत्यतिक
**असानी** — पु रिसीव्हरची नेमणूक होईपर्यंत त्याचे काम करणारा कोर्टाने नेमलेला अधिकारी
**असामयिक** — वि प्रसगाला न शोभणारे भलत्याच वेळचे
**असामी** — पु प्राणी व्यक्ति कूळ. प्रतिवादी कर्जदार मित्र. स्त्री परस्त्री वेश्या नोकरी.
**असामी बनाना** — कूळ गाठणे
**असालत** — स्त्री कुलीनता खरेपणा
**असावधानी** — स्त्री निष्काळजीपणा
**असासा** — अ पु सपत्ति पैसा-अडका.
**असीम** — वि अमर्याद अनत अपार
**असीसना** — क्रि स आशीर्वाद देणे
**असुविधा** — स्त्री अडचण त्रास
**असैला** — वि कुमार्गगामी विघडलेला अनुचित
**असोस** — वि न सुकणारा
**असौंध** — पु घाण
**अस्त** — फा क्रि आहे
**अस्तबल** — अ पु घोडशाळा तबेला.
**अस्तकारी** — फा स्त्री चुन्याचे लिंपण कल्हई चुना फासणे पलिस्तर
**अस्तुरा** — फा पु वस्तरा
**अस्थाई** — वि बदली काही मुदतीचे

अस्थिवैर – पु. हाडवैर
अस्नान – पु आघोळ स्नान
अस्पताल – इ पु रुग्णालय दवाखाना
अस्मत – स्त्री सतीत्व पातिव्रत्य
अस्मिता – स्त्री अहकार. मोह आत्मा व वुद्धि यात अभेद मानण्याची वृत्ति
अस्ल, अस्ली } – "असल" पहा
अस्वास्थ्य – पु. आजार आजारीपण
अस्वीकृत – वि अमान्य पडलेला (ठराव)
अस्सी – वि. ८०
अहकाम – अ पु नियम कायदा आज्ञा
अहद – अ पु प्रतिज्ञा करार राज्यकाल सकल्प
अहददार – फा पु. मुसलमानी काळातील अधिकारी (करवसुलीचा ठेकेदार)
अहदनामा – फा पु करारपत्र तहनामा
अहदी – अ. पु आळशी मठ्ठ अकवराचे राखीव शिपाई ( वेतन घेऊन वसून रहात. त्यावरून हा अर्थ आला)
अहवाव – फा वि आवडता
अहमक – अ वि मूर्ख अडाणी
अहमियत – अ स्त्री महत्त्व प्रथम निवड अग्रस्थान
अहरन – स्त्री ऐरण
– **की चोरी सुईका दान**–आवळा देऊन कोहळा काढणे.
अहरा – पु झगरे उतरण्याचा अड्डा. पाणपोई
अहरी – स्त्री पाणपोई हौद. जनावरास पाणी पाजण्याची कुंडी
अहलकार – फा. पु मुनीम कारकून.
अहलमद – फा पु नाझर
अहवाल – अ पु वृत्तान्त. स्थिति
अहसान – अ पु चागुलपणा.
– **फरामोश** – कृतघ्न
– **मंद** – कृतज्ञ
अहाता – अ पु आवार कुपण
अहारे-व्योहारे – यौ. भोजन व्यवहारामध्ये.
अहा (अहाहा) – अव्यय अहाहा !!
अहिटा – पु सारा वसूल करण्यासाठी शेतावर बसवून ठेवलेला जमीनदाराचा माणूस [लाळ.
अहिफेन – पु अफू सापाच्या तोंडातील
अहिवात – पु स्त्रियाचे सौभाग्य सववापण
अहिवातक – पु प्लेग
अही – क्रि अ आहे
अहीर – पु गवळी एक क्षत्रिय जाति.
अहीवाती – स्त्री सौभाग्यवती
अहूटन – पु चारा कापण्याकरता पुरलेला ओंडा
अहेर – पु शिकार
अहेरी (अहेरिया) – शिकारी.
"चित्रकूटगिरी अचल अहेरी"
अहै – क्रि अ आहे
अहोरा-वहोरा – पु लग्नातील एक रीत (सासरी जाऊन त्याच दिवशी माहेरी जाणे) क्रि वि वारवार.

## आ

आँक – पु अक, चिन्ह अक्षर काल्पनिक कथा सिद्धान्त भाग प्रसिद्ध वश. चाकाच्या धुरेची कैंची
आँकडा – पु सख्या पेंच. आकडीरोग.
आँकडी – स्त्री साखळी. [करणे.
आँकना – क्रि स चिन्ह डागणे अदाज
आँकर – वि खोल (नागरणी). अत्यत महाग.
आँकू – पु पहाणी करणारा
आँख – स्त्री. डोळा. लक्ष. पारख दृष्टि. सतान

**आँख** – पु डोळा (उसाचा) खवला (अननसाचा) नाक (सुईचे)
(उँनिंदी) –भारावलेले डोळे (झोपेने)
(कंजी) – माजरासारखे डोळे
(कँटीली) – मोहित करणारे डोळे
(गिल।फी) – कबुतरासारखे डोळे
(चियाँसी) – चिमुकले बारीक डोळे
(धँसी) – खोल गेलेले डोळे
(शरबती) – गुलाबी डोळे
– **उठना** – डोळे येणे
– **उठाना** – दृष्टि फेकणे वाईट दृष्टीने पाहणे
– **उलट जाना** – डोळे फिरणे (मरण-समयी) नजर फिरणे
– **ओट, पहाड ओट** – दृष्टीआड सृष्टि
– **कडुआना** – जाग्रणाने डोळे जड होणे
– **का अंधा, गाँठ का पूरा** –मूर्ख श्रीमत
– **का काँटा होना** – डोळ्यात सलणे
– **का काजल चुराना** – सफाईने चोरी करणे
– **का डेला** – डोळ्याचा पाढरा भाग
– **से उठाना** – सादर स्वीकार करणे
– **का तारा** – डोळ्यातील बाहुली अत्यत आवडते (मूल)
– **का तेल निकालना** – डोळ्यावर अत्यत ताण पडणारे काम करणे
– **का परदा उठाना** – ज्ञान होणे
– **का पानी ढल जाना** } निर्लज्ज होणे
– **का पानी मरना** }
– **की किरकिरी** – डोळ्यात सलणारी वस्तु
– **की ठडक** – अत्यत प्रिय व्यक्ति
– **की पुतली** – डोळ्यातील बाहुली प्रिय व्यक्ति
– **की बदी झाँके आगे** – इष्टमित्रा-समोर एखाद्याचे दोष सागणे
– **की सुइयाँ निकालना** – थोडेसे काम करून सगळे श्रेय मिळविणे
– **के आगे चिनगारी छूटना** – डोळ्या-पुढे काजवे चमकणे
– **को रो बैठना** – डोळे जाणे.
– **खटकाना** – डोळा दुखणे
– **खुलवाना** – मुसलमानात वरवधू-पुढे आरसा ठेवतात, त्यात आपली तोडे पाहण्याच्या क्रियेस "आँखें खुलवाना" म्हणतात
– **खोलना** – ताळ्यावर आणणे अजन घालणे
– **चूकना** – दुर्लक्ष होणे
– **नाक से डरना** – जनाची नाही तर मनाची तरी लाज बाळगणे
– **निकालना** – डोळे वटारणे
– **नीची होना** – लज्जित होणे
– **फडकना** – डोळा लवणे फरफरणे.
– **फूटी पीर गयी** – मूळ कारण नि नित्याचा परिणाम दोन्ही नष्ट झाली इग्रज गेला विटाळ गेला.
– **बचाकर काम करना** – कळू न देता काम करणे
– **बचे का चाँटा** – मुलाचा एक खेळ (ज्याचे लक्ष नसेल त्याला एक थप्पड तोबा-पाणी)
– **बदल जाना** – स्नेह कमी होणे
– **बहाना** – आसवे गाळणे
– **बिछाना** – प्रेमाने स्वागत करणे. वाटेकडे डोळे लावून बसणे.
– **बैठना** – डोळे खोल जाणे
– **भौं टेढी करना** – दात-ओठ खाणे.
– **मचकाना** – डोळे मिचकावणे
– **मिलाना** – समोर पाहणे
– **मोडना** – तिरस्कार वाटणे
– **लगी** – स्त्री प्रिया
– **लडना** – प्रेम जडणे
– **लडाना** – डोळा लावणे ("वाघाला भितोस ?" हा खेळ).
– **सेकना** – दर्शनसुख घेणे

**आँखें गडना** – डोळे येण्यापूर्वी दुखणे. दृष्टि खिळणे
– **गडाना** – डोळा ठेवणे रोखून पाहणे.
– **घुलना** – टक लावून पाहणे दृष्टि खिळणे
– **चढना** – डोळे तारवटणे.

— **चमकाना** — डोळा मारणे.
— **चरने जाना** — डोळे फुटणे (व्यग)
— **चार होना** — दृष्टादृष्ट होणे
— **चुराना** — तोड लपविणे
— **छत से लगना** — डोळे वद न होणे (मरणापूर्वी)
— **छिपाना** — टाळाटाळ करणे
— **जमना** — नजर ठेवणे
— **झपकना** — डोळे मिटणे
— **झपकाना** — डोळे घालणे
— **झेंपना** — लाज वाटणे
— **टँगना** — वुवुळे स्थिर राहणे
— **ठढी होना** — मनासारखे होणे
— **डवडबाना** — डोळे भरून येणे
— **डालना** — लक्ष देणे　　[होणे
— **तरसना** — पहाण्यासाठी व्याकुळ
— **तरेरना** — रागाने डोळे वटारणे
— **दवाना** — डोळा मिचकावणे
— **दिखाना** — सतापून पाहणे
— **पटपटा जाना** } फुटले डोळे
— **पट्टम होना** } (शिवी)
— **पडना** — लक्ष जाणे
— **पीली करना** — अत्यत रागाने पाहणे
— **फाड फाडकर देखना** — डोळे फाडून पाहणे
— **फटना** — डोळचात सलणे (व्यग)
**आँखो पर ठिकरी रख देना** — कृतघ्नपणा करणे अमर्यादा करणे
— — **विठाना** — अत करणपूर्वक स्वागत करणे　　[सभाळणे
— — **रखना** — तळहाताच्या फोडाप्रमाणे
**आँखो मे खटकना** — डोळचात खुपणे
**आँखो मे खून उतरना** — अगाचा तिळपापड होणे　　[खुपणे.
— — **गडना** — मनात वसणे डोळचात
— — **घर करना** — मन मोहून टाकणे
— — **चरवी छा जाना** — मस्ती येणे धुदी येणे
— — **चोव आना** — डोळे लाल होणे.
— — **झाँई पढना** — डोळे थकणे
— **टेसू फूलना** }
— **तीसी फूलना** } सगळीकडे तेच दिसणे
— **सरसो फूलना** }
— — **तरावट आना** — डोळचात तेज (स्फूर्ति येणे) चमकणे
— — **नोन राई** — "तळपट होवो" असे म्हणणे (स्त्रियाचा शाप)
— — **पालना** — लाडात वाढविणे
— — **फिरना** — डोळचात भरून राहणे
— — **वैठना** — डोळचात भरणे
— — **रखना** — सुखात ठेवणे
— — **रात काटना** — डोळचाला डोळा न लागणे सारी रात्र काळजीत जागून काढणे
— — **शील होना** — कोमल मन वनणे
— — **समाना** — हृदयात वसणे
**आँखो देखा** — प्रत्यक्ष पाहिलेले
**आँखो से उतरना** — मनातून उतरणे
— — **ओझल** — अदृश्य
— **काम करना** — मन पूर्वक काम करणे.
**आँखफोड टिड्डा** — पु नाकतोडा (प्राणी). कृतघ्न
— **मिचौनी** }
**आँखमिचौली** } — स्त्री आघळी कोशिवीर लपडाव.
— **मीचली** }
**आँखा** — पु मोठी चाळणी.
**आँखी** — स्त्री डोळा
**आंगन** — पु आगण चौक
**आंगिक** — वि अगासवधी.
— पु हावभाव. तत्र (टेक्निक्)
**आगी** — स्त्री आतली चोळी गजीफ्राक
**आगुर** — पु. अगुळ
"वलिपैं जाँचतही भये"
"वावन अगुर गात"
**आँच** — स्त्री उष्णता आग उकळी पुट तेज. आघात अहित शितोडा सकट माया
— **आना** — शितोडा उडविणे सकट येणे.
— **खाना** — आगीवर ठेवले जाणे फार तापणे
— **दिखाना** — ऊन करणे. आच देणे

— **पहुँचाना** — उष्णता देणे जखम किंवा नुकसान करविणे
**आँचका** — पु शीड सोडण्याची दोरी.
**आँचल** — पु पदर अंगावरील पदर.
— **डालना** — मुसलमान विवाहातील एक चाल
— **दबाना** — पिणे (बाळाचे)
— **देना** — मुलाला घेणे वर लग्नाला निघण्याच्या वेळची एक चाल वारा घालणे (पदराने)
— **पडना** — पदर पडणे लागणे (मुलाच्या अंगावर पडणे वाईट मानतात)
— **फावना** — एक तोडगा करणे (वांझ स्त्री—लेकुरवाळीचा पदर कातरते)
— **मे बांधना** — गाठी बांधून फिरणे गाठ (पदराला) मारणे टिपून ठेवणे ध्यानात ठेवणे
— **लेना** — वडील किंवा पाहुण्या स्त्रीच्या पदराला स्पर्श करणे आपल्या पदराने तिच्या पायास स्पर्श करणे
— **सँभालना** — पदर सावरणे
**आँचू** — पु एक काटेरी झाड (फळात गोड दाणे असतात)
**आँजन** — पु काजळ
**आँजना** — क्रि स काजळ घालणे
**आँट** — पु हाताच्या आंगठ्याचे वेचके डाव विरोध गाठ पेढी मोळी
— **पर चढना** — इरेला पेटणे
**आँटना** — क्रि अ "अँटना" पहा.
**आँटी** — स्त्री पेढी विटी टांग (कुस्तीचा पेंच), गुडा (दोऱ्याचा). कनवट
— **काटना** — खिसा कापणे
**आँटसाँट** — स्त्री गुप्तसंकेत कट घरोबा
**आँठी** — स्त्री आटी गाठ कंद घाणीच्या खांबाचा जाड भाग चाकाच्या भोका-तील लोखंडी वेढे
**आंडू** — वि "सांड" नसलेला बैल
**आंडे वांडे खाना** — मुलाचा एक खेळ उगीचच भटकणे

**आँत** — स्त्री. आतडे
— **उतरना** — वाट सरणे
— **का बल खुलना** — अनेक दिवसा-नंतर पोटभर जेवायला मिळणे.
— **खुलवाना** — जेवणात फार आग्रह करणे
**आँते कुलबुलाना** — पोटात कावळे कोकलणे.
— **गले मे आना** / — **मुंह मे आना** } तगड्या गळ्यात येणे·
— **समेटना** — भूक मारणे
— **सूखना** — भुकेने व्याकुळ होणे.
**आँतो मे बल पडना** — मुरकुंडी वळणे
**आँतकट्टू** — पु जनावरांना रेच होण्याचा रोग
**आंदोलन** — पु चळवळ वळवळ धूमधाम.
**आंध** — स्त्री धुंदी अंधेरी रातांधळे
— **आना** — जिवावर संकट येणे
**आँधी** — स्त्री बारीक कापड लावलेली मैद्याची चाळणी
**आँधी** — स्त्री वावटळ
— **उठना** — वावटळ येणे
— **उठाना** — खळबळ उडवून देणे
— **के आम** — फुकटची वस्तू स्वस्तात मिळालेली वस्तु
— **आना** — अंधेर होणे संकट येणे
**आँयबाँय** — पु व्यर्थ बडबड गयावया.
**आँवठ** — पु कांठ
**आँवडा** — वि खोल
"सोमारूपमागर अपार गुन आँवडे"
**आँवन** — पु चाकाच्या मध्यभागाचे लोखंडी वेढे छिन्नी
**आँवल** — पु गर्भावरण नाळ
**आँवलगट्टा** — पु आवळकाठी
**आँवला** — पु आवळा कुस्तीचा पेच
**आँवलापत्ती** — स्त्री मुरड (शिवण्याची).
**आँवा** — पु कुंभाराची भट्टी
— **आँवा बिगडना** — सर्व कुटुंब बिघडणे.
**आँवा का आँवा** — सर्व.
**आँस** — स्त्री दुखणे सुतळी. अश्रु
**आँसी** — स्त्री भाजी पुत्रोत्सवार्थ वाटलेली मिठाई

आँसू — पु. अश्रु
  — का तार बँधना — गंगायमुना वाहणे
  — गिराना (लोहू के) — अत्यंत आक्रोश करणे. [ वसणे
  — पीकर रह जाना — मनात चरफडत
  — पोछना — धीर देणे
  — भर आना — टिपे गाळणे
लोहू के आँसू रोना — रक्त आटेपर्यंत रडणे.
आँसुओ से मुँह धोना — ओक्साबोक्शी रडणे
आँ हाँ — अव्यय ऊं हूं नाही
आइंदा — फा क्रि वि पुढे यापुढे
  — पु यापुढील काळ
आईन — फा पु नियम विधि (कायदा)
आईना — फा पु आरसा
आईना होना — स्पष्ट होणे
आईनादार — फा पु आरसा दाखविणारा नोकर न्हावी
आईनाबंदी — फा स्त्री हड्या-झुंबरे लावणे लादी वसविणे सजावट करणे
आईनासाज — फा पु काचा वसविणारा व्यापारी
आईने मे मुँह देखना — आपली योग्यता किंवा सामर्थ्य अजमावून पाहणे
आउवाउ — स्त्री प्रलाप शिवीगाळ
आक — पु रुई
आंक की बुढिया — रुईचा कापूस थेरडी. म्हातारी (फुकून उडवितात ती)
आंकडा — पु रुई
आकवत — अ स्त्री परलोक
आकवत विगडना — वाईट परिणाम होणे
आकवत अंदेश — वि दूरदृष्टि
आकवती लंगर — फा पु सकटसमयी वापरण्याचा जहाजाचा नांगर
आकरकरडा / आकरकरहा } — पु अक्कलकरा
आका — अ पु धनी
आकाश — पु आकाश
आकाश की कोर — क्षितिज
आकाशदीया — पु आकाशकंदिल
आकाश वांधना — असंभव गोष्ट बोलणे.
आकाश से चढ़ना — असंभव कार्य करणे
आकाश से वाते करना — गगनचुंबी असणे. फार उंच होणे [ होणे
आकाश छूना या चूमना — अत्यंत उंच
आकाशपाताल एक करना — उपद्रव करणे मोठी चळवळ करणे.
आकाशवेल — स्त्री अमरवेल
आकाशवृत्ति — स्त्री अनिश्चित उपजीविका
आकाशी — स्त्री चांदवा.
आकिल — अ वि बुद्धिमान ज्ञानी
आकुल — वि उदास व्याकुल
आकूत — पु अभिप्राय
आकूति — स्त्री सदाचार. आशय उत्साह.
आखंडल — पु इंद्र
आखन — क्रि वि प्रतिक्षण हरघडी
आखर — पु अक्षर "आखर मधुर मनोहर दोऊ"
आखा — पु झिरझिरीत कापड लावलेली मैद्याची चाळणी
  — वि संपूर्ण. आत्मतृप्त
आखातीज — स्त्री अक्षय्यतृतीया
आखान — स्त्री कथा व्याख्यान
आखानवमी — स्त्री कार्तिक शु।। ९
आखिर — फा वि शेवटी शेवटचा
  — पु शेवट अंत समाप्ति
आखिरकार — फा क्रि वि शेवटी
आखिरी — फा वि शेवटचा.
आखीर की भरती — खोगीर भरती
आखुपाषाण — पु सोमल. चुंबकदगड.
आखेटक — पु मृगया शिकारी
आखोट — पु आक्रोड
आखोर — पु जनावरानी खाऊन शेष राहिलेले गवत केरकचरा निरुपयोगी वस्तु
आख्यात — स्त्री राजवंशाचा वृत्तान्त.
आख्यानिक — वि पौराणिक काल्पनिक.
आगंतुक — वि एकदम उपटणारा.
  — पु अतिथि पाहुणा विनवारशी जनावर
आग — स्त्री विस्तव आग ईर्ष्या कड (मायेचा) उष्ण वस्तु [ मोक.
  — पु उसाचे वाडे नांगरास जू बांधण्याचे

**आग उठना** — मांडण काढणे, आग पाखडणे
**आग का पुतला** — जमदग्नीचा अवतार.
**आग का बाग** — सोनाराची भट्टी
 — **के मोल** — अति महाग
 — **खाना अंगार हगना** — करावे तसे भरावे
 — **जोडना** — विस्तव पेटविणे
 — **झाडना** — विस्तव पाडणे
 — **धोना** — राख उडविणे
 — **पर लोटना** — तडफडणे चरफडणे
 — **पानी का वैर** — हाडवैर
 — **फाँकना** — लव्या बाता मारणे
 — **फॉकना** — खोटी वढाई मारणे
 — **फूंक देना** — अगाचा भडका होणे
 — **फूस का वैर** — हाडवैर
 — **बबूला होना** — रागाने लाल होणे
 — **बरसना** — उन्हाच्या झळया लागणे गोळ्याचा पाऊस पडणे
 — **बरसाना** — अस्त्राचा पाऊस पाडणे.
 — **बुझा लेना** — सूड उगविणे
 — **बोना** — कुरापत काढणे
 — **मूतना** — अमर्याद वागणे
 — **मे कूदना (किसी की)** — वाकड्यात शिरणे लष्कराच्या भाकरी भाजणे.
 — **लगना** — चुलीत जाणे (स्त्रियाचा सताप वा उद्वेग)
 — **लगाना** — दिवे लावणे (व्यग)
 — **(पानीमे)** अशक्य असे काम करणे
**आग लगाकर पानीको दौडना** — स्वत च भाडण लावून वर भाडण मिटविण्याचे ढोग करणे
**आग लगेपर कुआँ खोदना** — तहान लागल्यावर विहीर खणणे
**आग लेने आना** — त्याच पावली परतणे
**आग से पानी होना** — क्रोध एकदम शात होणे [ सतापणे
**(आँखो से) आग निकलना** — अतिशय
**(पेट की) आग** — स्त्री भूक
**आगटा** — पु दाणे गळलेले ज्वारीचे कणीस
**आगण** — पु मार्गशीर्ष

**आगम** — पु. आगमन. भविष्य
**आगम करना** — उपक्रम रचणे. उपायरचना करणे
**आगम सोची** — वि दूरदर्शी
**आगमी** — पु सामुद्रिक पाहणारा ज्योतिषी.
**आगरवध** — पु हार
**आगरी** — पु मीठ बनविणारा.
**आगल** — पु अडसर
 — क्रि वि समोर पुढे
 — वि पुढचा
**आगवन** — पु आगमन
**आगा** — पु पुढील भाग आगा भविष्य. खाच खळगा
 — **तागा लेना** — स्वागत करणे.
 — **भारी होना** — गर्भार होणे
 — **मारना** — पाय मागे ओढणे
 — **मारा जाना** — भविष्य बिघडणे
 — **रोकना** — आघाडी सभाळणे पुढे उभे राहणे
 — **लेना** }
 — **सँभालना** } — आक्रमणाला तोड देणे.
**आगा** — तु पु धनी अफगाण सरदार.
**आगाज** — अ पु प्रारभ
**आगाह** — फा वि जाणणारा सावध
 — **करना** — सावध करणे प्रकट करणे.
**आगाही** — फा स्त्री ज्ञान
**आगान** — पु आख्यान वृत्तान्त
**आगामी** — वि पुढे येणारे
**आगुका** — पु तरवारीच्या मुठीचा गोल भाग
**आगे** — क्रि वि पुढे यानतर पूर्वी. ओटीत (मूल)
 — **आगे** — क्रमश पुढे
 — **आना** — फळ मिळणे
 — **करना** — पुढे ठेवणे पुढे करणे
 — **का** — उष्टे पुढील
 — **की उखेड** — कुस्तीतील एक पेंच.
 — **की** — पुढे पुन्हा
 — **चलकर** — यानतर यापुढे
 — **डोलना** — मूलवाळ खेळणे.

**आडि** — पु हट्ट आग्रह — "इनको यही सुभाव है पूरी लगी आडि"
**आड़ी** — स्त्री बाजू सहायक.
— पु भिडू [ करणे
**— करना** — वर्ख रुदीत ठोकणे लबाडी
**आड़ू** — पु सफ्ताळू अळूचे फळ.
**आढ** — पु ४ शेरी वजन अतर
— वि कुशल दक्ष
— स्त्री एक मासा टिकली
**आढक** — पु ४ शेरी वजन पायलीचे लाकडी माप तुरी
**आढत** — स्त्री अडत दलाली अभिकर्तृत्व
**आढतिया** — पु. दलाल अभिकर्ता
**आणि** — पु सीमा कोन
**आतंक** — पु धाक दरारा प्रताप भय रोग मृदगाचा नाद
**— छाना** —
**— जमना** — } दबदबा असणे भीति बसणे
**— फलना** —
**आततायी** — पु घातकी आततायी सहा आहेत आग लावणारा, विष पाजणारा, शस्त्रधारी, पैसेचोर, शेत बळकावणारा, बायको पळवून नेणारा
**आतश** — फा स्त्री. आग. आट्ठी (आतिश)
**आतशक** — फा स्त्री उपदश गरमी
**आतश-खाना** — } फा पु अग्निस्थान
**आतश-गाह** — } विशेषत पारशी लोकाचे
**आतश-दान** — फा पु शेगडी कुड
**आतश-परस्त** — फा पु अग्निपूजक
**आतश-बाज** — फा पु शोभेची दारू बनविणारा
**आतश-बाजी** — फा स्त्री दारूकाम
**आता** — पु सिताफळ
**आतापि** — स्त्री धार
**आतिथ्य** — पु अतिथिसत्कार आगत-स्वागत
**आती-पाती** — स्त्री चादण्यातील एक खेळ (एका मुलाला चोर बनवून पान तोडायला लावून इतर मुले लपतात ज्याला शिवेल तो चोर)

**आतुर** — वि रोगी दुखी
**आत्मत्याग** — पु स्वार्थत्याग
**आत्मदर्शन** — पु समाधीच्या द्वारा आत्मा व ब्रह्म पाहणे
**आत्मश्लाघा** — स्त्री स्वत चे स्वत च गुण-गान करणे
**आत्मा** — स्त्री आत्मा मन देह
**— ठडी होना** — आत्मा तृप्त होणे. जीव खाली पडणे मूक शात होणे.
**आत्माभिमान** — पु स्वाभिमान.
**आत्मावलंबी** — वि स्वावलबी
**आत्मीय** — वि आपला
— पु स्वजन नातेवाईक
**आतुराना** — क्रि अ उतावळे होणे घाबरणे.
**आतू** — स्त्री पडिताची बायको
**आत्मोत्सर्ग** — पु जनकल्याणार्थ स्वार्थत्याग.
**आदत** — अ स्त्री सवय. स्वभाव
**— डालना** — सवय लावून घेणे
**आदम** — अ पु अरबी लोकाच्या मते जगातील पहिला मानव माणूस
**— खार** — नरपिशाच्च
**आदमज़ाद** — अ, पु मनुष्य.
**आदमियत** — अ स्त्री माणुसकी
**—पकडना** — सभ्यपणा शिकणे
**आदमी** — पु माणूस सेवक
**— बनना** — सभ्यपणा शिकणे चागले वागणे
**आदान-प्रदान** — पु देवघेव देवाणघेवाण.
**आदाब** — अ पु पद्धति मर्यादा नमस्कार.
**— अर्ज** — नमस्कार
**— बजा लाना** — यथायोग्य नमस्कार करणे
**आदि** — वि पहिला सर्वप्रथम
— पु प्रारभ मूळ
—अव्यय — इत्यादि
**आदिम** — वि पहिला पूर्वीचा
**आदिल** — फा वि त्यागी
**आदेश** — पु आज्ञा उपदेश प्रमाण गृह-फल एका अक्षराच्या जागी दुसरे अक्षर येणे (व्या)

आदी — अ वि. सवयीचा. चटावलेला
उ. 'मातु न जानसि बालक आदी'

आध — } वि अर्धा
आधा — }

आधा तीतर आधा बटेर — विसंगत गंगा-
जमनी

आधा-क्षारा — पु आधाजा अर्धशिशी

आधी बात — स्त्री उणा शब्द विचारपूर्ण

आधेआध } — वि बरोबर दोन (भाग)
आधोआध }

आन — वि अन्य
— स्त्री मर्यादा शपथ ब्रीद ऐट
तऱ्हा धोरण क्षण. प्रतिज्ञा. धाक.
— की आन मे — बोलता बोलता.
— तोडना — प्रतिज्ञाभंग करणे
— मानना — धाक बाळगणे
— पर जान देना — ब्रीदासाठी प्राण देणे

आनन फानन — अ क्रि वि — झटपट
तत्काळ

आनबान — स्त्री. थाटमाट शृंगार

आना — पु एक आणा
— क्रि अ वाटणे शिजणे

आ जाना — क्रि अ सापडणे येणे

आता जाता — येणारा-जाणारा संभोग
करणारा

आ धमकना — क्रि अ अचानक येणे

आनक — पु डंका भेरी मेघगर्जना

आनक-दुंदुभी — पु मोठा नगारा वसुदेव

आ निकलना — अनायासे येणे

आ पडना — } कोसळणे अंगावर पडणे
आ रहना — } आक्रमण करणे

आ लेना — जवळ जाणे पकडणे

आना (का) — पु येणे निघणे

आ बनना (की) — चैन होणे. संकट येणे
(पर) — संकट कोसळणे

आना (पर) — निश्चय करणे
(मे) — भाव पडणे

आनाकानी — स्त्री. टाळाटाळ दुर्लक्ष
कानगोष्टी

आनाम — अ पु मानवजात

आनीजानी — स्त्री [illegible] येणारी-
जाणारी

आनुपूर्वी — नि. क्रमानुसार [ [illegible]

आप — सर्व [illegible]. [illegible]
— पु पाणी

आप — स भगवान्
"[illegible]
[illegible]"

आप काज (काप) — पु. [illegible]
— बीती — [illegible]
[illegible].
— आप करना — [illegible].
— को पडना — [illegible]
[illegible]
— से आप } [illegible]
— से ही } आपोआप

आपत्ति — स्त्री [illegible]
[illegible] विरोध

आपत्ति करना — विरोध करणे

आपगा — स्त्री नदी

आपरूप — वि साक्षात् [illegible] महा-
पुरुष [illegible] ([illegible]).

आपस — स्त्री संबंध नाते
— की — [illegible] [illegible].

आपसदारी — स्त्री. [illegible] [illegible]

आपसी — वि घरगुती [illegible]

आपा — पु अस्तित्व आत्मा [illegible].
अहंकार घमेंड शुद्ध
— स्त्री [illegible] बहीण (मुसलमानी).
— खोना — }
— डालना — } [illegible]
— तजना — } आपलेपण नष्ट करणे

आपाधापी — स्त्री आपली [illegible] ओढा-
ताण

आपान — पु दारूचा गुत्ता [ जागा.

आपापथी — पु कुमार्गी मनमाना मार्गाने

आपे मे आना — शुद्धीवर येणे
— न रहना — } मर्यादा सोडणे.
— से बाहर होना — } (मनापासून) भान
विसरणे

**आफ़त** — अ स्त्री सकट आपत्ति
**— उठाना** — दु ख सहन करणे
प्रळय करणे
**— का टुकडा** — अत्यत उद्योगी
**— का परकाला** — कामाला राक्षस.
**— का मारा** — दुर्दैवी
**— ढाना** — } प्रळय करणे.
**— तोडना** — } छळणे
**— मचाना** — } गोधळ माजविणे
**आफत सिर पर लेना** — सकट ओढवून घेणे
**आफताब** — फा. पु सूर्य [ झारी
**आफताबा** — फा पु हातपाय धुण्याची
**आफताबी** — फा स्त्री. अबदागीर
— वि गोल सूर्यासबधी [गुलकद
**आफताबी गुलकद** — उन्हात बनविलेला
**आफरीन** — अ अव्यय वाहवा ! काय छान !
**आफियत** — अ स्त्री क्षेमकुशल
**आब** — फा पु पाणी चमक महिमा शोभा
**— आना** — काति येणे तेज येणे
**— चढाना** — मुलामा करणे उत्साह देणे
**— लाना** — शोभा वाढविणे
"आब आब कर मर गये"
"मिरहाने रखा पानी"
**आबकार** — फा पु कलाल दारूदुकानदार
**आबखोरा** — फा पु फुलपात्र पेला
**आबगीना** — फा पु काचेचा पेला
आरसा हिरा
**आबगीर** — फा पु विणकऱ्याची फणी
**आबजोर** — फा पु मनुकाचा काढा
**आबताब** — फा स्त्री काति शृंगार
**आबदाना** — फा पु उपजीविका अन्नोदक
**— उठना** — अन्नोदक सरणे
**आबदार** — फा वि चमकणारे कातिमान.
**आबदारी** — } फा स्त्री चमक झिलई.
**आबनजूल** — } काती
**आबनूस** — फा पु शिशाचे झाड
**— का कुंदा** — काळाकुट्ट मनुष्य
**आबनूसी** — फा वि काळाकुळकुळीत रग (शिशाचा)

**आबपाशी** — फा स्त्री. शेतास पाणी-पुरवठा भू-सिंचन
**आबरवाँ** — फा पु झिरझिरीत मलमल.
**आबरू** — फा स्त्री प्रतिष्ठा मान अब्रू.
**आबला** — फा पु फोड चट्टा
**आबला पडना** — फोड उठणे
**आबाद** — फा वि वसलेले प्रसन्न सुपीक.
**आबादकार** — फा पु जगल तोडून वस्ती करणारा स्वत च वसूल करणारा जहागिरदार [शेतजमीन.
**आबादी** — फा स्त्री वस्ती लोकसख्या.
**आबाशिनास** — फा पु पाण्याची खोली सागून मार्ग दाखविणारा नाविक.
**आबिद** — पु उपासक
**आबी** — फा वि पाण्याचे पाण्यासबधी. पाण्यात राहणारा फिक्का फिक्क्या निळ्या किंवा आकाशी रगाचा. समुद्रतटीचा
— पु सैन्धव एक पक्षी (मुर्गावी). द्राक्षाची एक जात
**आबी रोटी** — स्त्री नुसत्या पाण्यात कणिक भिजवून केलेली पोळी भाकरी.
**आबी करना** — पाजणी करणे
**आबे हयात** — पु अमृत
**आभा** — स्त्री चमक काती
**आभाष** — पु भूमिका अनुष्ठान प्रबध उपक्रमणिका
**आभास** — पु प्रतिबिंब नावाला असणें. सुगावा भ्रम
**आभिचारक** — पु हिंसक
**आभिजात्य** — पु सौंदर्य योग्यता पाडित्य.
**आभीर** — पु गवळी
**आम** — पु आबा
—वि आबट. कच्चे
**— के आम गुठली के दाम**—लाभच लाभ.
**— खाने से काम या पेड गिनने से ?** — नसत्या उठाठेवी कशाला ? पायावर पाणी घाल तर म्हणे साखळ्या केवढ्याच्या ?
**— पापड** — आबावडी

आम — अ वि सर्वसाधारण सामान्य
— खास — खागा स्वारीची बैठक
— फहम — सर्वांना समजेल असे
— तौरपर — सामान्यत
आमद — फा. स्त्री आगमन मिळकत
— आमद होना — जाण्याची वेळ येऊन ठेपणे आल्याचा बोभाटा होणे
आमदनी — फा स्त्री. उत्पन्न प्राप्ति. आयात दोन्हीकडून लाभ
आमदरफ्त — फा स्त्री जाणे-येणे
आमन — वर्षांत एकच पीक जीत निघते ती भूमि
आमना — स्त्री हिंवाळ्यात पेरण्याची भूमि [दृष्टादृष्ट
आमना-सामना — पु समक्ष भेट सामना.
आमने-सामने — क्रि वि. समोरासमोर
आमय — पु रोग
आमरख — पु संताप अमर्ष
आमला — पु आवळा.
आमदगी — फा स्त्री सिद्धता तत्परता.
आमादा — फा वि उद्युक्त. सिद्ध
आमाल — अ पु कर्म करणी
आमालनामा — अ पु सर्व्हिस बुक
आमा-हलदी — स्त्री आंबेहळद
आमिख — पु मास.
आमिन — स्त्री लहान आंब्याची एक जात
आमिल — अ पु अनुष्ठान करणारा अधिकारी मांत्रिक सिद्ध [भोजन.
आमिष — पु मास लालूच संभोग लाच
आमी — स्त्री कैरी एक पहाडी वृक्ष (तुंगा), याच्या टोपल्या होतात लोवी.
आमुख — पु प्रस्तावना नाटकाचे एक अंग
आमेज़ — फा वि मिसळलेले
आमेज़िश — फा स्त्री मिसळ
आमेजना — क्रि स मिसळणे.
आमोख्ता — फा पु उजळणी
आमोद-प्रमोद — पु सुखविलास आनंद
आंयती-पांयती — स्त्री उसे-पायथे
आय — स्त्री मिळकत प्राप्ति वसूल
आयत — अ स्त्री कुराणातील श्लोक विशाल
आयव्यय — पु जमाखर्च [अवेक्षक
आयव्यय-निरीक्षक — हिशेब-तपासनीस
आया — पुर्तु स्त्री दाई
आया — फा अव्यय — काय ?
आयु — स्त्री वय आयुष्य
— घटाना — आयुष्य कमी करणे.
— सिराना — आयुष्य संपणे
— की रेखा मिटाना — मरणाची इच्छा करणे "आयु की रेखा मिटावति मानो" [साखे-मारखे
आये दिन — अव्यय नेहमी. रोजरोज
आयेगये होना — मिळणे न मिळणे सारखेच होणे रमारमी होणे
आयोजन — पु योजना सामग्री
आयोधन — पु लढाई
आर — पु अशुद्ध लोखंड पितळ कोपरा किनारा आरा डसाचा रस कढईतून काढण्याचा झारा साच्यावरील मातीचे आवरण हट्ट वैर
— स्त्री. चूक (लोखंडी). कोंबड्याच्या पंजावरील काटा आरी नागी
आरजा — पु रोग आजार
आरज़ू — स्त्री इच्छा वासना विनंती
— बर आना — इच्छा पूर्ण होणे
— मिटाना — करणे.
आरज़ूमंद — फा वि इच्छा करणारा.
आरत — वि दु खी भीरु पीडित
उ "सुनतहि आरतवचन प्रभु"
आरती — स्त्री आरती
— उतारना — आरती ओवाळणे
— लेना — आरती घेणे
आराति — शत्रु विरोधी
"भुवि नहिं तव सिरपर आराति"
आरात् — अव्यय जवळ
आरनाल — पु गव्हाचे सत्त्व कांजी
आरपार — पु दोन्ही टोके
— क्रि वि आरपार
आरसा — पु नाडा दोरीची गाठ
आरा — पु करवत चांभाराची आरी चाकाचा आरा. खुंटाळ्याची पट्टी कडी (लाकडी वा लोखंडी) हूक

**आरामिका** — फा स्त्री आरास सजावट वरातीतील कागदी बाग
**आराकश** — फा पु करवत्या अरकस
**आराई** — अ स्त्री भूमि शेत
**आराम** — पु विश्रांति सुख बाग आरोग्य आराम
**आराम करना** } — निजणे
**— मे होना** }
**आराम से** — हळूहळू [जाणे
**आराम मे से गुजरना** — सुखात दिवस
**आरामगाह** — फा. पु शयनमंदिर
**आराम-तलब** — फा वि सुकुमार कष्ट न करणारा आळशी [पेटी
**आरामदान** — फा पु पानाचा डबा शृंगार-
**आरास्ता** — फा वि शृंगारलेले सुसज्जित
**आरिया** — स्त्री खिरा पावसाळी काकडी
**आरी** — स्त्री करवत पराणी आरी किनारा काठ
**आरी** — अ वि त्रस्त
**— आना** — कटाळून जाणे
**आरेस** — पु ईर्ष्या
"कबहुँ न करेहु सवति आरेसू"
**आलगी** — पु घोडीची मस्ती
**— पर आना** } — मस्तीत येणे
**— होना** }
**आल** — पु हरताळ (औषधी) तटा अश्रु आळी
— स्त्री राईचे पीक खाणारा किडा काद्याची पाती दुध्या भोपळा मुलीची सतति वंश कूळ ओलावा
**आल-औलाद** — स्त्री पोरेबाळे
**आल-जजाळ** — पु तटावखेडा
**आलथी-पालथी** — स्त्री पद्मासन
**— मारना** } — माडीवर पाय चढवून
**— लगाना** } बसणे
**आलन** — पु गाऱ्यात घालण्याचे गवत आळण भाजीत घातलेले बेसन किंवा पीठ
**आलपीन** — पुर्तु स्त्री सेफ्टीपिन
**आलम** — अ पु जग सृष्टि जनसमूह दशा एक नाच

**आलमारी** — स्त्री कपाट
**आला** — पु कोनाडा आवा (कुमाराचा).
— वि हिरवेगार ओला
**आला** — अ पु हत्यार सतारीचे कोमल स्वर
— वि सर्वश्रेष्ठ
**आलात** — पु मशाल जळती वोथाटी जहाजाचा नाडा
**— काश्तकरी** — शेतीची अवजारे
**— खाना** — जहाजात नाडे ठेवण्याची खोली [किंवा साखळदंड.
**आलान** — पु हत्ती बांधण्याचा खुंट दोर
**आलाबु** — स्त्री दुध्या भोपळा
**आलाराशी** — वि निष्काळजी अदाधुंद
**— कारखाना** — अदाधुंदी सावळागोंधळ
**आलिम** — अ वि पंडित ज्ञानदान
**आली** — स्त्री सखी मैत्रीण चार विस्व्याचे प्रमाण
— वि भिजलेली पिवळ्या रंगाचे
— अ वि श्रेष्ठ माननीय
**आलीजाह** — अ वि उच्च स्थानाचा छानदार
**आलील** — वि चचल अस्थिर
**आलीशान** — अ वि भव्य विशाल
**आलू** — पु बटाटा वाटोळे फळ
— स्त्री झारी लोटी
**आलूचा** — फा पु पिवळे आंबट गोड फळ (वाळल्यावर त्याला आलूबुखार म्हणतात)
**आलू-बालू** — पु एक फळ (हे फळ हिमालयात होते पण यूरोपमध्ये त्याचे अनेक उपयोग करतात)
**आलूबुखार** — पु आलुबुखार
**आलोक** — पु प्रकाश चांदणे चमक दर्शन
**आलोचक** — वि टीकाकार
**आलोचना** — स्त्री टीका गुणदोष-विवेचन.
**आल्हा** — पु ३१ मात्रांचा वीर छंद लांबलचक वर्णन
**— का पँवार** — लांबण वितंडवाद
**— गाना** — कोणतीही गोष्ट खूप वाढवून सांगणे

आवभगत – स्त्री आदरसत्कार

आवागमन – पु } वाहतूक
आवागवन – पु } येणे-जाणे
आवाजाही – स्त्री } ये-जा

आवाज – फा स्त्री ध्वनि बोली वाणी गळा (गाण्याचा)
- उठाना – तार स्वरात गाणे ओरड करणे
- लगाना – जोराने हाक मारणे
- कसना – गरजून बोलणे.
- देना – मोठ्याने हाक मारणे
- पर लगाना – शब्द ओळखून मारणे
- भर्राना – घोगरा स्वर निघणे
- भारी होना – गळा बसणे
- मारना – मोठ्याने हाक मारणे
- मारी जाना – स्वर कर्कश होणे
- लडना – स्वर जुळणे

आवाजा – फा पु टोमणा व्यंग
- कसना } – घालून-पाडून बोलणे
- मारना }

आवाप – पु पेरणी आवणी आळे
आवारगी – फा स्त्री लवाडी निरुद्योगीपणा
आवारजा – फा पु जमाखर्चाची वही लेखा-पुस्त
आवारा – फा पु निरुद्योगी उठवळ
आवारागर्द – वि भटक्या, निराश्रित लुच्चा
आवारागर्दी – फा स्त्री. वात्रटपणा. उगीच भटकणे
आवाहन – पु निमंत्रण बोलावणे
आविष्कार – पु नवीन शोध प्रकटीकरण
आवेजा – फा पु लटकणारी वस्तु लोलक
आवेदन-पत्र – पु अर्ज फॉर्म
आवेल-तेरू – पु सोवरेल
आशंका – स्त्री भय शंका
आशना – उभ प्रेमी (परिचित).
आशनाई – फा स्त्री ओळख प्रेम अनुचित संबंध

आशा – स्त्री अप्राप्त वस्तु मिळविण्याची इच्छा नि तीचा भरवसा आस. [illegible]
- टूटना – आशाभंग होणे
- तोडना – निराश करणे
- देना – आशा लावणे
- बंधना – आशा वाटणे.

आशिक – अ पु प्रेम करणारा अनुरागी पुरुष
- होना – फिदा होणे

आशियाँ } – फा पु घरटे, खोपटे
आशियाना } आश्रयस्थान

आशिष – स्त्री आशीर्वाद
आशीविष – पु भुजंग साप
आशु – क्रि वि जलद लौकर
आशुकवि – पु शीघ्रकवि [करणारा
आशुतोष – वि लौकर संतुष्ट होणारा
आशुफ्ता – वि घाबरलेला व्याकूळ
आसंग – पु प्रेम आसक्ति संबंध
आसंदी – स्त्री [illegible] ([illegible]) लहान पाट

आस – स्त्री "आशा" पहा. दिशा
- तकना – वाट पाहणे [illegible] अपेक्षा करणे
- पूजना – इच्छा पूर्ण होणे
- होना – आशा असणे गर्भ असणे पाठीराखा असणे

आसकत – स्त्री सुस्ती
आसक्ति – स्त्री सख्य जवळीक मुक्ति
" सूर तुम्ह यह आस [illegible]
" तुम ब्रह्मविना नहि आसक्ती "

आसन – पु स्थिति बसण्याची पद्धति बैठक आसन [illegible] हत्तीची मान
- उखडना – पदच्युत होणे घोड्यावर मांड न टिकणे
- उठाना – जागा बदलणे [बसणे
- कसना – अंगाचा मुटकुळा करून
- जमाना – प्रस्थ बसणे स्थिर बसणे.
- जमाना – स्थिर बसणे मांडा ठोकणे [उत्पन्न करणे.
- डिगाना – स्थानभ्रष्ट करणे लोभ

**आसन तले आना** — वश होणे
  — **पाटी** — स्त्री अथरूण-पाघरूण
  — **लेकर पडना** — फुरगटून निजणे
  — **बाँधना** — घोड्यावर माड दाबून बसणे
  — **मारना** — माडा ठोकणे
  — **लगाना** — राहणे

**आसनी** — स्त्री आसन पाट

**आसमाँ** / **आसमान** — फा पु आकाश स्वर्ग देवलोक

**आसमान के तारे तोडना** — अशक्य वाटणारे काम करणे

**आसमान जमीनके कुलाबे मिलाना** — थापा मारणे भगीरथ प्रयत्न करणे

**आसमान झाँकना** — (**ताकना**) ताठरणे झुजीसाठी कोवड्याची मान ताठ करणे

**आसमान टूट पडना** — आकाश कोसळणे
  — **दिखाना** — चीत पाडणे
  — **पर उडना** — गर्व करणे मनोरथ करणे वड्या वड्या गोष्टी करणे
  — **पर चढना** — गर्वाने फुगणे ऐटी करणे [चढविणे
  — **पर चढाना** — हरभऱ्याच्या झाडावर
  — **पर थूकना** — सूर्यावर थुकणे

**आसमान मे थिगली लगाना** — / **आसमान मे छेद करना** — विकट काम करणे

**आसमान सिर पर उठाना** — प्रचड चळवळ करणे घर डोक्यावर घेणे खळवळ उडविणे

**आसमान से टपकना** — न बोलावता येणे एकाएकी प्रगट होणे

**आसमान से बाते करना** — अत्यत उच असणे, गगनचुंबी असणे

**आसमान-खोचा** — फा पु उच वासा उच मनोरा उच टाग्या माणूस लावच लाव नळी असलेला हुक्का (हुक्का तळमजल्यावर नी नळी तिसऱ्या मजल्यावर ओढणाऱ्याच्या हाती)

**आसमानी** — फा वि आकाशी (रग). निळसर आकाशातील
  —स्त्री ताडी
  — मिश्र (इजिप्त) देशातील कापसाची जात पालखीचे पुढील भोई झाडाची फादी लागण्यासारखी दिसली म्हणजे हा शब्द ओरडतात

**आसमानी होना** — रतिप्रसगास सिद्ध होणे

**आसरा** — पु आश्रय, आधार, भरवसा.

**आसा** — "आशा" पाहा [काठी.
  — अ पु चोपदाराची सोन्याचादीची

**आसाइश** — फा पु सुख, चैन

**आसाढ** — पु आषाढ

**आसान** — फा वि सोपे

**आसानी** — फा स्त्री सुगमता सहजपण.

**आसामी** — पु आरोपी देणेदार धनवान् व्यक्ति
  उ दस लाख के आसामी

**आसार** — स्त्री मुसळधार पाऊस मेघमाला.
  — अ पु चिन्ह, लक्षण, रुदी

**आसीस** — पु उसे उशी आशीर्वाद.

**आसुतोस** — पु शकर लौकर प्रसन्न होणारा

**आसूदगी** — फा स्त्री सतोष

**आसूदा** — फा वि सतुष्ट सपन्न
  — **हाल** — खाऊन पिऊन सुखी

**आसेब** — फा पु भूतबाधा

**आसेर** — पु किल्ला

**आस्तीन** — फा पु बाही

**आस्तीन का साँप** — हितशत्रु अस्तनीतील निखारा

**आस्तर** — पु आसव हत्तीची झूल शय्या.

**आह** — स्त्री उसासा, कण्हणे
  — अव्यय अरेरे ! तळतळाट

**आह खींचना (भरना)** — उसासा टाकणे.

**आह पडना** — शाप बाधणे

**आह लेना** — तळतळाट घेणे.

**आहट** — स्त्री चाहूल पायाचा आवाज.
  — **पाना** / — **मिलना** — चाहूल लागणे

आहत – वि घायाळ गुण्य थरथरणारे.
– पु ढोल

आहाॅ – पु थरकाप ओरडा आव्हान
– अव्यय ऊहू !

आहा – अव्यय अहाहा !

आहाव – पु क्षुद्र जलाशय (डवके) युद्धासाठी निमत्रण

आहिताग्नि – पु अग्निहोत्री.

आहिस्ता – क्रि वि हळूहळू

आहुक – पु मृत्तिकावत् नगरच्या राजा भोजाचे वशज राजे अभिजित् याच्या जोड सततीपैकी एक याच्या पत्नीचे नाव "काश्या." हिच्यापासून 'देवक' व 'उग्रसेन' हे दोन पुत्र झाले। देवक श्रीकृष्णाचे आजोबा व उग्रसेन कसाचा पिता.

आहोपुरुषिका – स्त्री आत्मप्रशंसा

## इ

इग, इगन – पु सकेत खूण, थरथर कापणे

इंगनी – स्त्री मॅंगनीज काचेचा हिरवेपणा नाहीसा करणारा धातु

इंगलिस्तान – पु इग्लड

इंगित – पु इशारा सकेत

इगुदी – स्त्री हिंगणबेट मालकागणी.

इंगुरौटी – स्त्री कुकवाची डबी

इजिल – पु स्त्री बायबल

इटकोहरा – पु विटकरीचा तुकडा रोडा.

इंडहर – पु कळण्याचा शिंगोळा

इंडुरी – स्त्री, इडुवा – पु – चुंवळ

इंतकाल – अ पु मरण वारसा जाणे

इतजाम – अ पु व्यवस्था

इंतजार – अ पु प्रतीक्षा विरह

इंतहा – अ पु सीमा अत

इंदारा – पु आड

इदिया – अ पु विचार मत

इंदुआ – पु चुंवळ

इदुर – पु उदीर "कीन्हेसि खोवा इन्दुर चीटी"

इद्रजाली – वि जादूगार

इंद्रवज्रा – स्त्री एक अक्षरगण वृत्त ज, त, ज हे तीन गण व शेवटी दोन गुरु अक्षरे

इंद्रिय – पु, इद्री – स्त्री – इद्रिय.

इंधन – पु जळाऊ लाकूड. पेटवण सर्पण

इधरौडा – पु जळण ठेवण्याची खोली.

इन्साफ – अ पु न्यायनिवाडा.

इक – वि एक

इकठ्ठा – वि एकत्र एकदम

इकतरा – पु एक दिवसाआड येणारा ताप.

इकतार – वि एकजीव सारखे

इकतारा – पु एकतारी हातविणीचे कापड (११ इच पन्हा).

इकताला – पु एकताल.

इकतीस – वि ३१

इकदाम – अ पु सकल्प इरादा

इकपेचा – पु दिल्ली-आग्र्याकडील एक पगडी

इकबारगी – क्रि वि एकदम. एका तडाक्यात

इकवल, इकबाल – पु प्रताप वैभव.

इकराम – अ पु. दान पारितोपिक माहात्म्य आदर

इकरार – अ पु प्रतिज्ञा वायदा करार

इकलाई – स्त्री झिरझिरीत ओढणी उपरणे एकटेपण

इकडाही – स्त्री एकसवि कढई

इकलौता – पु एकुलता एक.

इकल्ला – वि एकेरी एकटा

इकवाई – स्त्री एकाच बाजूला कोर असलेली ऐरण

इकसट — वि ६१
इकहरा — वि एकेरी [काक-वध्या
इकौंज — स्त्री एकच मूल असलेली स्त्री
इकौनी — वि विनजोड अनुपम
इकौसी — वि एकान्त विलकुल. अलग
इक्का — वि एकटा अद्वितीय
— पु एकच मोत्याची भिकवाळी एका घोड्याची गाडी एक्का
इक्का-दुक्का — वि एकटा-दुकटा
इक्कासी — वि ८१
इक्की — स्त्री एक्का (पत्त्यात)
इक्कीस — वि २१
इखराज — अ पु निकास खर्च उचल
इखलाकी कैदी - पु. सामान्य वदी
इखलास — पु मैत्री परीक्षा प्रेम भक्ति सवध
इख्तसार — पु सक्षेप खुलासा
इख्तियार — अ पु अधिकार. अधिकारक्षेत्र सामर्थ्य स्वामित्व
इख्तिलाफ — अ पु विरोध फरक मनोमालिन्य
इगमाज़ — पु उपेक्षा अवहेलना
इगवा — पु मुलविण्याची क्रिया
इजमाल — अ पु कुल सयुक्त अधिकार भागिदारी
इजरा — स्त्री कस कमी झाल्यामुळे काही काळ पडित ठेवलेली जमीन
इजलाल — पु प्रतिष्ठा शोभा
इजलास — अ पु वैठक कचेरी सभा-स्थान
इजहार — अ. पु प्रकटीकरण साक्ष.
इजाजत — स्त्री आज्ञा अनुज्ञा. मान्यता
— इज़ाफा — पु वढती वचत
इज़ाफा — अ पु वढती उन्नति बचत
— लगान — पु सारावाढ
इजारबंद — फा पु विजारीची नाडी
इजारदार / इजारेदार } — फा वि मक्तेदार
— अ. पु. मुदतबदी भाड्याने देणे मक्ता—अधिकार [अधिकार
इजारा — पु भाड्याने वस्तु देणे ठेका

इज्जत — अ स्त्री मान प्रतिष्ठा आदर. अब्रू
— उतारना — पाणी उतरविणे.
— करना / — देना } मान देणे
— पाना — मानसन्मान मिळविणे प्रतिष्ठा प्राप्त होणे
— विगाडना — अब्रू घेणे
— रखना — आव राखणे
इठलाना — क्रि अ ऐट दाखविणे चढून जाणे नखरे करणे वेड घेऊन पेड-गावाला जाणे
इठलाहट — स्त्री ऐट नखरा
इत-उत — क्रि वि इकडे तिकडे
इतना — वि इतके
इतने मे — इतक्यात
इतराना — क्रि अ गर्व करणे. इतरणे मदाध होणे
इतराहट — स्त्री ऐटी उन्माद
इतवार — पु रविवार
इति — स्त्री. समाप्ति
इतिकथा — स्त्री अर्थशून्य वाक्य
इत्ता — वि इतके
— क्रि वि इकडे येथे
इतकाद / इतमीनान }-फा पु विश्वास सतोष
इतराज — अ पु प्रत्यवाय. अप्रसन्नता.
इत्तफाक — अ पु एकी योगायोग.
— पडना — वेळ येणे
— से — योगायोगाने
इत्तला — अ स्त्री सूचना
— लिखना — अधिकाऱ्याला कळविणे.
इत्र — फा पु अत्तर
इत्रदान — पु अत्तरदाणी
इत्रीफल — पु त्रिफळा
इत्रफरोश — पु अत्तर विकणारा सुगधी.
इदबार — पु दुर्भाग्य
इदराक — पु समज वुद्धि
इद्दत — स्त्री विधवेचे ४० दिवस सुतक (मुसलमानी पद्धति)

इधर – क्रि वि इकडे येथें.
– की उधर करना – लावालावी करणे
– उधर – इकडे तिकडे इतस्तत जवळपास आजूबाजूला
– उधर करना – टाळाटाळ करणे अस्ताव्यस्त करणे पळविणे. लम्वे करणे
– – की वात – कडी गप्प. वडवड
– – की हाँकना – थापा मारणे
– मे रहना – टिवल्यावावल्या करणे
इधर की उधर लगाना – चहाडी करणे. एकमेकात वैरभाव निर्माण करणे
इधर की दुनिया उधर होना – असभव गोष्ट होणे
इधर का उधर होना – उलटापालट होणे
न इधर होना न उधर – तटस्थ राहणे (न्यूट्रल) [ होणे.
इन्किलाव – पु क्राति, मोठे परिवर्तन
इन्तकाम – पु सूड
इन्तहा – पु शेवट
इफ्लास – पु गरिवी
इन – सर्व ह्या ('इस'चे अनेकवचन)
इनकार – पु नकार
इनसान – अ पु मनुष्य जीव
इन्सानियत – अ स्त्री माणुसकी वुद्धिमत्ता सज्जनता
इनाम – अ पु पारितोपिक पुरस्कार
– इकराम – प्रसन्न होऊन दिलेला पुरस्कार [ (व्यग).
इनाम करना – कृपेने देणे क्षमा करणे
इनाम फरमाना – कृपा करणे.
इनायत – स्त्री कृपा दया अनुग्रह
इना-गिना – वि मोजके थोडें
इने-गिने – काही थोडे निवडक
इन्ही (इन+ही) – ह्याच
इफरात – स्त्री वाहुल्य
इफ्तखार – अ पु स्वाभिमान.
इवरानी – अ वि यहुदी. [भाषा
–स्त्री फिलीस्तीन (पॅलेस्टाइन) ची
इवलीस – अ पु सैतान, पाजी.

इवादत – अ स्त्री. पूजा आरावना
– खाना – आरावनेचे स्थान
इवारत – अ स्त्री. लेख लेखनशैली.
इवारती सवाल – राममुद्दलाचे उदाहरण.
इव्तिदा – अ स्त्री प्रारम जन्म
इमकान – अ पु शक्ति. मगदूर योग्यता.
इमदाद – अ स्त्री. सहाय
– घोटना – मुलाच्या किंवा मुलीच्या मामाने आव्याचा डहाळा दातानी तोडावयास लावणे नि दक्षिणा वाटणे.
इमदादी – वि सहायक
इमन – पु यमनराग
इमरती – स्त्री जिलवी
इमली – स्त्री चिंच.
इमाम – अ पु मुसलमानी पुरोहित. अलीच्या वशातील पदवी जपमाळ
इमाम-दस्ता – फा पु. लोखडी किंवा पितळी खलवत्ता [ जागा.
इमाम-वाडा – अ पु तावूत ठेवण्याची
इमामा – फा पु फेटा पगडी
इम्तहान – अ पु परीक्षा
इयतियात – अ स्त्री सावधानता वचाव
इरसी – स्त्री चाकाची वुरा
इर्द-गिर्द – क्रि वि. समोवती जवळपास
इर्शाद – पु आज्ञा
इरादा – अ पु विचार सकल्प.
इलजाम – अ पु आरोप कलक. अपराव.
– लगाना – नावे ठेवणे आरोप करणे
इलविला – स्त्री कुवेराची आई.
इलहान – पु सगीत
इलहाम – अ पु ईश्वरी वचन [सबंध
इलाका – अ पु प्रात. राज्य. सस्थान
इलाज – अ पु औषध चिकित्सा युक्ति
इलाम – पु आज्ञा हुकूम सूचनापत्र उ "ठान्यो न सलाम मान्यो साह को इलाम."
इलायची – स्त्री वेलदोडा
– डोरा – वेलदोड्याचा गुच्छ.
– दाना – वेलदोड्याचा दाणा
– पडू – एक रानफळ.
इलाही – अ. पु ईश्वर. परमात्मा

**इलाही गज** — अ पु अकबराने चालू केलेला गज (४१ =अगुळें ३३।।। इच)
**इलाहीरात** — स्त्री जागरणाची रात्र
**इल्ला** — अव्यय परतु शिवाय
— पु पुळी मस
**इल्लिल्लाह** — हे परमेश्वरा! सहाय कर.
**इल्ली** — स्त्री जन्मत मुगी इत्यादि जीवाचे रूप
**इल्ली बिल्ली भूलना** — भान नाहीसे होणे. बेभान होणे
**इल्जाम** — अ पु 'इलज़ाम' पहा
**इल्तिजा** — अ स्त्री प्रार्थना
**इल्म** — अ पु ज्ञान, माहिती विद्या
**इल्लत** — अ पु रोग दुखणे आपत्ति अपराध
**इशरत** — अ स्त्री सुख चैन [प्रेरणा
**इशारा** — अ पु सकेत खूण सूक्ष्म आधार.
**इश्क** — अ पु प्रेम अनुराग आसक्ति
**इश्कपेचाँ** — अ पु सुतासारखी पाने नि तावडी फुले असणारी वेल
**इश्तहार** — अ पु जाहिरात
**इशारत** — स्त्री आराम सुख
**इष्टापत्ति** — स्त्री प्रतिपक्षाचे आपणास अनुकूल भाषण
**इस** — सर्व ह्या ('यह'चे सामान्यरूप)

**इसपात** — पु पोलाद.
**इसहाल** — पु अतिसार
**इस्तगी** — अ स्त्री शीड ताणण्याचा नाडा.
— **चापना** — शीड ताणणे
**इस्तिरी** — स्त्री इस्तरी.
**इहलीला** — स्त्री अवतारकार्य
**इसपंज** — इ पु स्पज
**इस्पंद** — फा पु मोहरी राई
**इसरार** — अ पु हट्ट आग्रह सारगी-सारखे एक वाद्य घासाघीस
**इसलाम** — अ पु मुसलमानी धर्मपथ.
**इसलाह** — अ पु सुधारणा सशोधन.
**इस्तमरारी** — अ वि नित्य अविच्छिन्न.
— **बदोबस्त** — कायमधारा पद्धति
**इस्तिजा** — अ पु लघवीनतर इद्रियाला लावलेला विटकरीचा तुकडा (मुसलमानी क्रिया)
**इस्तिजा लडना** / — **लडाना** } — अत्यत मैत्री करणे
**इस्तिजे का ढेला** — कवडी किमतीचा मनुष्य.
**इस्तीफा** — अ पु त्यागपत्र
**इस्तेमाल** — अ पु उपयोग
**इस्म** — अ पु नाव
— **नवीसी** — तलाठ्याची नेमणूक
**इहसान** — अ पु उपकार

## ई

**ईंगुर** — पु हिगुळ
**ईंच मनौती** — स्त्री. जमीनदार आपल्या कुळाच्या सावकाराकडून वसूल करून कुळाच्या नावे सारावसुली करतो त्यास म्हणतात
**ईंट** — स्त्री वीट चौकट (पत्त्यात).
— **गढना** — वीट करणीने नीट करून बसविणे
— **चुनना** / — **जोडना** / — **पाथना** / — **पारना** } — विटा पाडणे

— **का छल्ला देना** — कच्च्या भितीला जोडून एकविटी भित रचणे
— **से ईंट बजना** — विध्वस होणे.
— **से ईंट बजाना** — उद्ध्वस्त करणे.
— **की मस्जिद अलग बनाना** — (डेढ़ या ढाई) — निराळाच पथ काढणे. सगळ्याच्या विरुद्ध वागणे
— **का (ढेला) मारना (गुड दिखाकर)** नादी लावून फसविणे
— **पत्थर** — दगड (व्यग) काही नाही.
**ईंड** — वि सारखे (प्रा प).
**ईंडरी** — स्त्री. चुंबळ.

ईंत – पु वार लावण्याच्या चाकाला लावावयाचा विटेचा तुकडा
ईंदर – पु खरवस
ईंधन – पु सर्पण. जळण
ईख – स्त्री ऊस
ईखना – क्रि स पाहाणे.
ईखराज – पु ऊस पेरण्याचा पहिला दिवस
ईजा – अ स्त्री. दु ख पीडा
– पहुँचाना – त्रास देणे.
ईजाद – अ स्त्री प्रारभ नवा शोध
ईटि – स्त्री मैत्री प्रयत्न
ईठी – स्त्री माला प्रिय
ईती – स्त्री शेतावरील सकटे (ही सहा प्रकारची आहेत)
ईद – अ स्त्री प्रतिपदेची रात्र मुसलमानी सण.
– के चाद होना – फार कमी गाठ होणे अतिप्रिय होणे
ईदगाह – अ पु मुसलमानाच्या साधिक प्रार्थनेचे स्थान
ईदी – अ स्त्री सणाची भेट सणाची प्रशसा असलेली कविता ही कविता ज्या वेलवुट्टीच्या कागदावर लिहिली जाते तो कागद या कवितेनिमित्त शिष्यानी मौलवीस दिलेली गुरु-दक्षिणा.
ईमन – अ पु. यमनराग
ईमान – अ पु विश्वास श्रद्धा, सद्वृत्ति.
– की कहना – सत्य सागणे.
– ठिकाने न होना – धर्म-भावना चळणे
– मे फर्क आना – मन चळणे.
– लाना – श्रद्धा ठेवणे
ईमानदार – फा वि विश्वासू प्रामाणिक.
ईवींसीवी – स्त्री सभोगानदामुळे निघणारा इस् इस् शब्द
ईर्ष्या – स्त्री द्वेष जळफळ
ईर्ष्या-षंढ – वि. अर्ध-नपुसक
ईर्ष्यालु – वि मत्सरी
ईल – पु एक जगली जनावर स्त्री वागमासा
ईसरगोल – पु इसबगोल (औषधि)
ईसराक – वि अतिशय (फा) खर्चिक.
ईसा – अ पु येशू
ईसामसीह – अ. पु येशू ख्रिस्त
ईहग – पु कवि
ईहा – स्त्री चेष्टा उद्योग

## उ

उंगनी – स्त्री वगण लावण्याची क्रिया.
उंगली – स्त्री बोट
– उठना (किसीपर) निंदा होणे.
– उठाना – निंदा करणे, दोषी ठरविणे. वाकड्या नजरेने पाहणे
– करना – सतावणे नकोसे करणे.
– चटकाना – बोटे मोडणे शाप देणे
– चमकाना }
– नचाना } – हातवारे करणे
– देकर निकालना – घरातून बाहेर काढणे
– देना (साँप के मुँह मे) – अचाट कृत्य करणे. वाघाच्या तोंडात हात घालणे.
उंगली दिखाना – धमकी देणे घाबरविणे.
उंगली पकडते पहुँचा पकडना – भटाला दिली ओसरी तर भट हळूहळू हात-पाय पसरी.
उंगली रखना – (मुँह पर) चूप राहण्याचा सकेत
उंगली रखना – दोष काढणे
उंगली लगाना – शिवणे बोट लावणे. हातभार लावणे
उंगलियाँ घी मे होना (पाँचों) – लाभच लाभ होणे चैन होणे
उंगलियो पर नचाना – बोटावर खेळविणे.
उँचन – स्त्री. खाटेच्या पायतण्याची दोरी.

उँचना — क्रि स वाज ओढणे.
उँजेरा } — पु उजेड
उँजेला }
उँडेल्ना — क्रि स ओतणे उडविणे.
उँदर — पु उदिर
उँदरी — स्त्री. टक्कल
उँदरू — उदरुचे झाड
उह — अव्यय नाही तिरस्कारसूचक शब्द
उऋण — वि. कर्जमुक्त
उकचन — पु मुचकुदाचे फूल
उचकना — क्रि अ जागा बदलणे उचकटणे
उकटना — क्रि स पुन पुन उगाळणे
उकटा — वि आपण केलेला उपकार फार वेळा बोलून दाखविणारा मागचे उकरून काढणारा
उकटा-पुरान — मागील गोष्टी उकरून काढणे
उकटेरना — क्रि स (उष्टें) टाकणे.
उकठना — क्रि स सुकणे चिमटणे.
उकठा — वि शुष्क सुकटलेला वठलेला.
उकडू } — वि उकिडवे
उकरू }
उकताना — क्रि अ कटाळणे अधीर होणे.
उकवथ — पु इसव
उकलना — क्रि स उकलणे उचकटणे
उकलाई — स्त्री ओकारी
उकलाना — क्रि अ ओकारी होणे
उकसना — क्रि अ उमळून येणे बाहेर दिसू लागणे उसवणे
उकसाना — क्रि स उत्तेजित करणे चढविणे सरसावणे (दिवा)
"हाथिन के हौदा उकसाने"—भूषण कवि
उकाब — अ पु गरुड
— स्त्री अफवा
उकासी — वि उघडी झालेली
— स्त्री उत्सव मुट्टी
उकेला — पु घोगडीतील ताणा
उकोना — पु डोहाळे
उखटना — क्रि. अ. पाय लटपटणे. कुरतडणें.
उखडना — क्रि अ उपटणे निखळणे. हटणे बेसूर होणे उखडणे उसवणे.
(तबियत) उखडना — मन न लागणे. अरुचि निर्माण होणे [करणे.
उखडी-उखडी बातें करना — उडवा-उडवी
उखडी-पुखडी सुनाना — तोड टाकून बोलणे
उखडी उखडना — गमजा चालणे.
(दम) उखडना — प्राण जाणे. बेसूर होणे दम उखडणे (कुस्तीत).
(पाँव या पैर) उखडना — स्थिर न राहणे पळून जाणे. [दिवस.
उखराज — पु उसाच्या पेरणीचा पहिला (उत्तरेत शेतकरी उत्सव करितात).
उखली — स्त्री उखळ उखळी
उखाडना — क्रि स उपटणे उखडणे. विचकविणे हटविणे नष्ट करणे.
(कान) उखाडना — कान उपटणे.
(गडे मुर्दे) उखाडना — शिळ्या कढीला ऊत आणणे
(पैर) उखाड देना — पळवून लावणे.
उखाड-पछाड — स्त्री उलटापालट. घडपड लावालावी
उखाडू — वि चुगलखोर
उखालिया — पु न्याहरी
उखेडना } — " उखाडना " पहा
उखेरना }
उगटना — क्रि अ तेच तेच सागणे. उगाळणे (व्यग) टोमणा देणे.
उगना — क्रि उगणे उगवणे उपजणे.
उगलना — क्रि स ओकणे थुकून टाकणे.
(जहर) — गरळ ओकणे
उगल पडना — क्रि तलवार म्यानातून काढणे [वदविणे.
उगलाना — क्रि स. कबूल करविणे तोडून
उगाना — क्रि स उगवणे प्रगट करणे. उगारणे [सकेत).
उगाल — पु पिक. थुकी जुनेरे (ठगाचा
उगाल-दान — पु पिकदाणी थुकण्याचे भांडें.
उगाला — पु पीक खाणारा किडा
— स्त्री पाण्याने भरलेली भूमि. भातखाचर. पानमळा.

**उगाहना** – क्रि. स वसूल करणे गोळा करणे (वर्गणी)
**उगाही** – स्त्री वसुली
**उघटना** – क्रि अ ठेका धरणे मागील गोष्टी उकरून काढणे. एखाद्याचा वाप काढणे
**उघटा** – वि केलेला उपकार पुन पुन वोलून दाखविणारा
**उघड़न** – क्रि अ नग्न होणे आवरण दूर होणे वेड फुटणे [होणे
**उघडना** – क्रि अ निर्लज्ज होणे प्रगट
**उघरना** – क्रि अ उघडे पडणे.
**उघाडना** – क्रि स. उघडणे खोलणे
– स्त्री झडप पडदा
**उघार** – स्त्री झडप पडदा
**उघारना** }
**उघेलना** } – उघडे पाडणे प्रकट करणे
**उचकन** – पु टेकण
**उचकना** – } क्रि अ चौडचावर उभें राहणे
**उझकना** – } उडी मारणे उचलणे
**उचका** – क्रि वि अचानक सहसा.
**उचकाना** – क्रि स उचलणे उच करणे
**उचक्का** – पु उचल्या लुच्चा. मामटा
**उचटना** – क्रि अ निखळणे. सुटणे विरक्त होणे विचकणे
**उचटाना** – क्रि स उचकवणे सोडणे खिन्न करणे चिकविणे
**उचडना** – क्रि अ उडून जाणे
**उचाट** – पु खिन्नता [करणें
**उचाटना** – क्रि स विरस करणे खिन्न
**उचाटू** – वि उदासीन विरक्त
**उचाना** – पु. स्वप्नात वरळणे
**उचायत** – पु एका दुकानातून एकसारखे उधार घेत राहणे
**उच्चारण** – पु उच्चार
**उच्छृंखल** – वि निरकुश मनमानेल ते करणारा [ उत्कठा
**उच्छाह** – पु उत्साह जैनाची रथयात्रा
**उच्छू** – स्त्री ठसका
**उच्छंग** – पु माडी आलिंगन हृदय.
– **लेना** – आलिंगन देणे.

**उछलकूद** – स्त्री चचलता. अधीरपणा. खेळणे धडपड. खटाटोप
**उछलकूद करना** – उत्साह दाखविणे. धडपड करणे
**उछलना** – क्रि अ वरखाली होणे उसळणे. उडी मारणे. नाचणे (आनदाने). स्पष्ट उमटणे तरगणे
**उछलवाना** – क्रि स उसळविणे उमटविणे, उडविणे (चेडू इ)
**उछाल** – स्त्री उगी (चेडूची) लाव उडी. ओकारी
– **भरना** – लाव उडी मारणे
**उछालछक्का** – वि व्यभिचारिणी छिनाल टवळी
**उछालना** – क्रि स उच फेकणे वाडवडिलाच्या नावाला डाग लावणे
**उछाला** – पु उत्साह जोर ओकारी.
**उजक** – तु पु मोगली मोठी पहार.
**उजडना** – क्रि अ उध्वस्त होणे ढासळणे
**उजडा** – वि नष्ट अनाथ उजाड झालेले.
**उज्जड** – वि जगली उद्धट महामूर्ख.
**उजलत** – अ स्त्री घाई गडवड
**उजवक** – तु स्त्री तार्तार जाति
– वि अडाणी मूर्ख
**उजरत** – अ पु निरुपाय, भाडे.
– **पर देना** – भाड्याने देणे
**उजला** – वि उजळ पाढरे स्वच्छ
**उजली** – स्त्री धोवीण (मुसलमान स्त्रिया रात्री धोवीण म्हणणे वाईट समजतात त्याच्या ऐवजी उजली म्हणतात)
**उजागर** – वि चमकणारे प्रकाशमान.
**उजाडना** – क्रि स विध्वस करणे उसवणे. उपटून टाकणे. घोडे मारणे
**उजान** – क्रि वि प्रवाहाच्या उलट
**उजालना** – क्रि स उजळविणे स्वच्छ करणे
**उजाला** – पु प्रकाश चादणे.
– **होना** – दिवस उगवणे
(**आँखो का**) **उजाला** – अत्यत प्रिय.
**घर का उजाला** – कुलदीपक मुलगा.

**उजाले का तारा** – पु शुक्र ग्रह
**उजाली रात** – स्त्री चादणी रात्र
**उजास** – पु चमक प्रकाश
**उजियारा** – पु प्रकाश. चादणे कुलदीपक – वि उज्ज्वल
**उजियारी** – स्त्री प्रकाश चादणे साध्वी
**उजूबा** – अ पु चमकदार टिंबे असलेला खडा
**उज्जल** – क्रि वि प्रवाहाचे उलट बाजूला
**उज्र** – अ पु. अडथळा वक्तव्य
**उज्रदारी** – फा स्त्री न्यायालयात फेर-तपासणीचा अर्ज कैफियत
**उजेला** – पु प्रकाश चादणे
**उझलना** – क्रि स ओतणे – क्रि अ भरून वाहणे
**उझाँकना** – क्रि स डोकावणे
**उझिला** – स्त्री लेप लावण्यासाठी भाजलेली मोहरी शेतातील मातीचे टेकाड
**उझीन** – पु झगरे रचण्याची क्रिया
**उटंग** – वि अपरा लाडा अलगत वरच्यावर
**उटडपा** } – पु गाडी टेकविण्याची
**उड्ढा** } लाकडी कैंची
**उटन टाटक** – वि ओवडधोवड खड-वडीत
**उटारी** – स्त्री चारा कापण्याचा ओडा
**उटेव** – पु खवला
**उठँग जाना** – टेकून बसणे, लवडणे
**उठंगल** – वि असभ्य वावळट ठोंब्या
**उठँगाना** – क्रि अ टेकण लावणे क्रि स टेकून ठेवणे लावणे (दार).
**उठना** – क्रि अ उठणे. वर येणे उन्नति होणे उच होणे (विचार) वर येणे उसळणे जागें होणे उगवणे निघणे (चर्चा) उमटणे फदफदणे खर्च होणे खपणे
**उठ जाना** – नष्ट होणे बद होणे भाड्याने जाणे लक्षात राहणे बाघणे
**उठती कोपल** – स्त्री तारुण्य.
**उठती जवानी** – तारुण्याचा प्रारम
**उठती परती** – केवळ लागवडीच्या शेताचा सारा
**उठा-बैठी** – उठवस. खटाटोप उठवशी.
**उठाबैठी लगाना** – बेचैन होणे.
**उठल्लू** – उठवळ भटक्या
**उठवाना** – क्रि म. उचलविणे उठवणे.
**उठवैया** – पु उठविणारा दूर हटविणारा.
**उठागन** – पु मोठे आगण. पटागण
**उठान** – स्त्री उत्थान वाढ. प्रारभ. उठाव खर्च
**उठाना** – क्रि स उठविणे वाढविणे उचलणे धारण करणे भाडण काढणे. प्रारभ करणे बाजूला सारणे वाघणे. उभारणे वद करणे भाड्याने देणे. सोसणे. शिरसामान्य करणे.
**(आसमान सर पर) उठाना** – अधिक-पणा करणे उपद्रव करणे
**(सिर) उठाना** – गर्व करणे.
**(आवाज) उठाना** – विरोध करणे
**उठा धरना** – पुढें जाणे
**उठा रखना** – कसर ठेवणे शिल्लक ठेवणे.
**उठाव** – पु मेहरपीच्या पायाच्या मध्या-पासून मेहरपीच्या टोकाचे लम्बान्तर.
**उठौनी** – स्त्री मजुरी बयाणा उधारी. दक्षिणा हुडा मेलेल्या माणसाच्या कुटुबाला जातीच्या लोकानी दिलेले दान (वैश्यातील रीत) अस्थि सावडण्याची क्रिया आवणी (भात-शेतीची) बाळतिणीची शुश्रूषा
**उडंत** – पु दसरग (कुस्तीत)
**उड़ जाना** – पळत येणे
– **चलना** – भरधाव जाणे शोभणे चमचमीत होणे वाईट मार्गाला लागणे अमर्याद वागणे
**उडता बनना** } – पसार होणे
– **होना** }
**उड़ती खबर** – गप्प किंवदन्ती
**उड़द** – (पु) उडीद
**उड़न** – स्त्री उडण्याची क्रिया भरारी.
**उड़न-खटोला** – पु उडणारा पलग विमान.
**उड़न-गोला** – पु. वायबार.

उड़न-छू — वि अदृश्य गडप
उड़न-झाँई — स्त्री हातावर तुरी थाप.
उड़न-फल — पु उडण्याची शक्ति देणारे फळ
उड़न-फाखता — वि मूर्ख भोळा
उडना — क्रि अ उडणे. पसरणे. फड-फडणे पसार होणे कापणे फाटणे नाहीसे होणे काढले जाणे चट्टामट्टा होणे. उपभोगणे विटणे (रंग) थापा मारणे उडी मारणे
उड़नी — स्त्री मुडदूस रोग
उड़री — स्त्री बारीक उडीद
उड़ाका — वि उडणारा
उड़ाकू — पु विमान-चालक
उड़ान — स्त्री भरारी उडी टप्पा मनगट.
उड़ान-घाई — स्त्री लबाडी (विशेषत जुगारात).
उड़ान-परदा — पु. बैलगाडीचा पडदा
उड़ान मारना — थापा मारणे
उड़ाना—क्रि स उडविणे पसरविणे नाहीसे करणे लावविणे काढून टाकणे गट्ट करणे उपभोगणे फुटणे लावणे (पत्ते). विषय बदलणे. टाळणे गुपचूप हस्तगत करणे
उड़ाल — पु वाहाव्याची साल किंवा तिच्यापासून केलेली दोरी
उडासना — क्रि स अथरुण गुडाळणे उद्ध्वस्त करणे. सतावणे.
उड़िया — सि उडिसा (ओरिसा) चा प्रांताचा
—स्त्री उडिया भाषा
उड़िल — पु लोकर न कापलेला मेढा
उड़िस — पु ढेकूण
उड़ीसा — पु (ओरिसा) उत्कलदेश.
उडुंबर — पु उंबर
उड़ूस — पु ढेकूण
उडेलना — क्रि स ओतणे शिपडणे.
उडैनी — स्त्री काजवा. "साम रैन जनु चलै उडैनी"
उढ — पु वागुलबोवा (शेतातील)
उढ़कन — पु ठोकर टेंकण. [टेंकणे
उढ़कना — क्रि अ अडणे ठेंच लागणे.
उढकाना — क्रि स टेकून ठेवणे. टेंका देऊन बसविणे
उढ़रना — क्रि. अ विवाहित स्त्रीचे (एखाद्याचा) हात धरुन पळून जाणे.
उढरी — स्त्री. रखेली नवरा टाकून दुसऱ्याजवळ राहिलेली स्त्री पळविलेली स्त्री
उढाना — क्रि स पांघरविणे
उढ़ारना — क्रि. स. अपहरण करणे
उढावनी — स्त्री } ओढणी
उढौनी — स्त्री } चादर
उतंग — वि उंच गभीर श्रेष्ठ उत्तुंग.
उतना — वि तितके
उतन्ना — पु वरची बाळी बुगडी
उतपात — पु संकट उपद्रव
उतमंग — पु (स. उत्तमांग) डोके
उतरंग — पु दाराच्या चौकटीच्या वरील लाकूड किंवा फरशी उतरंग.
उतरन — पु. जुनेरे
उतरना — क्रि अ उतरणे. ओहोटी लागणे. निखळणे. फिक्के पडणे. अधिक होणे (आवा). भपत येणे. फाटणे (दूध) निघणे (खरबूज इ). भरणे (मापात). बनणे (मोहरे) वसूल होणे. पार होणे
उतराई — स्त्री. नावेचे भाडे
उतराना — क्रि अ तरंगणे (पाण्यावर). वर येणे मार्गे लागणे. भटकणे फिरणे.
उतराव — पु. उतार.
उतरिन — वि. कर्जमुक्त
उतला — वि उतावळा.
उतान — वि. उताणा
उतार — पु पसरण्याची प्रवृत्ति. उतार. उतारा. ओहोटी. हलका सतरंजी-मागील वास (विणणाऱ्यापासून दूर).
उतार चढाव बताना — फसविणे
उतारना — क्रि स उतरविणे. चित्र काढणे उतरुन घेणे (लेख) सोलणे काढून घेणे (साय) काढून ठेवणे ओवाळणे. फेडणे (ऋण) वसूल करणे. गिळणे. बनविणे. प्याद्याचे मोहरे बनविणे.

**उतारा** — पु पडाव मुक्काम. अड्डा. नदीचा उतारा बळी (ओवाळून टाकलेला)
**उतारू** — वि तत्पर उद्युक्त
—पु. प्रवासी
(पर) — होना — प्रवृत्त होणे
**उतावला** — वि चचल उतावळा. घाबरट.
**उत्कीर्ण** — वि खोदलेले
**उत्कोच** — पु लाच
**उत्कुण** — पु ढेकूण ऊ
**उत्तमर्ण** — पु धनको
**उत्तर-काशी** — स्त्री हरिद्वारच्या उत्तरेकडील एक तीर्थ
**उत्तरदाता** }
**उत्तरदाई** } — पु जबाबदार व्यक्ति
**उत्तरदायित्व** — पु जबाबदारी फलभार
**उत्तराधिकारी** — पु वारस. पट्टशिष्य. गादीवर बसणारा.
**उत्तान** — वि उताणा.
**उत्तीर्ण** — वि पार मुक्त यशस्वी
**उत्तुंग** — वि फार उच
**उत्तू** — फा पु खडी काढण्याचा ठसा
—वि बेहोष [ मारणे
— करना — खडी काढणे वळ उठेतो
**उत्तूकश** — }
**उत्तूगर** — } — फा पु खडीवाला.
**उत्तेजन** — पु } प्रेरणा. प्रोत्साहन
**उत्तेजना** — स्त्री } तीव्र वेग उसळी
**उत्स** — पु झरा
**उथपना** — क्रि स उच्चाटन करणे
**उथलना** — क्रि स डगमगणे, थरकाप होणे खालीवर होणे
**उथल-पुथल** — पु उलथापालथ
**उथला** — वि उथळ
**उदग्ग**— }
**उदग्र** — } वि उन्नत वर उग्र
**उदक-क्रिया** — स्त्री मृत व्यक्तीच्या नावाने जलतर्पण
**उदक-परीक्षा** — स्त्री हातात पाणी घ्यावयास लावून (गगेचे वगैरे) शपथ घ्यावयास लावणे.

**उदपान** — पु विहिरीजवळची पाण्याची कुडी उ "यावानर्थ उदपाने"
**उदर-भंग** — पु अतिसार
**उदरिणी** — स्त्री. गर्भिणी [ न राहणारा.
**उदवस** — वि उजाड. सुना एका जागी
**उदासी** — स्त्री खिन्नता. उदासीनता
**उदाहर** — स्त्री भुरा पुसट पुसट रग.
**उदंबर** — पु उबर उबरठा नपुसक एक प्रकारचे कोड तांबे ८० रतीचे वजन
**उदोत** — पु प्रकाश वाढ बढती शोभा. "तिनको उदोत केहि भाँति होय".
**उद्दंड** — वि दाडगा उद्धट अकडबाज.
**उद्देश्य** — पु अभिप्रेत अर्थ ध्येय
**उद्भट** — वि उदार श्रेष्ठ
**उद्यम** — पु व्यापार उद्योग
**उद्योग** — पु धदा प्रयत्न उलाढाल.
**उद्धरण** — पु उतारा अवतरण उद्धार (उन्नति) [ श्रीकृष्णाचा मित्र.
**उद्धव** — पु उत्सव यज्ञाचा अग्नि.
**उद्वाह** — विवाह [ कागद.
**उघडना** — क्रि अ उसवणे निघून जाणे
**उधर** — क्रि वि तिकडे तेथे
**उधराना** — क्रि अ विखुरणे दाणादाण होणे शेफारणे. उधळणे
**उधार** — पु ऋण, उद्धार
—वि उधार
— **खाये बैठना** — अत्यत उत्सुक असणे. टपून बसणे नाश इच्छिणे
— **खाना और भुस में आग लगाना** — रोज कर्ज काढणे नाश होणे
**उधेडना** — क्रि स उसवणे. सोडविणे.
**उधेडबुन** — पु भ्रम विचार-चक्र. ऊहापोह.
**उन्नावी** — अ वि किरमिजी
**उनमानना** — क्रि स अनुमानणे जाणणे.
**उनमुना** — वि चुपचाप मौन
**उनमेद** — पु पहिल्या पावसाने जलाशयात आलेला फेस (विषारी असतो. याने मासे मरतात) [ चालणे.
**उनरना** — क्रि अ उसळणे चवड्यावर
**उनवना** — क्रि अ लटकणे झुकणे. आकाश भरून येणे तडाखा बसणे

उनहानि – स्त्री समता बरोबरी.
उनहार – वि समान सदृश
उनिद्र – वि झोप नसलेला विकसित
उन्मना – वि व्याकुळ
उनींदा – वि जागरणाने मारावलेला डोळा
उनासी – वि ७९
उन्नीस – वि १९
उन्नीस बिस्वे – शंभर टक्के
– होना – } थोडें कमी थोडें अंतर.
– बीस होना – } वेडेंवाकडें (संकट)
उन्हीं – सर्व (उन+ही) त्याच.
उपंग – पु नसतरंग (वाद्य) उद्धवपिता
उपकार्या – स्त्री राजभवन अन्न ठेवण्याची जागा
उपक्रोश – पु निंदा निर्भर्त्सना
उपक्षेप – पु प्रारंभी नाटकाच्या संपूर्ण वृत्तान्ताचे संक्षिप्त कथन
उपख्यान – पु कथा "एक उपख्यान कहत निसुतनसें
सुनहु आज उपागे" [चिकित्सा
उपचर्या – स्त्री शुश्रूषा रोगशान्ति
उपजाऊ – वि सुपीक
उपजाना – क्रि स उत्पन्न करणे
उपजीवी – वि दुसऱ्याच्या आश्रयावर उपजीविका करणारा [पूर्वज्ञान
उपज्ञा – स्त्री उपदेशावाचून ईश्वरदत्त
उपटन – न उटी, उटणा
उपटना – क्रि अ. उमटणे उपटणे
उपटाना – क्रि स उच्चाटन करणे उपटणें
उपढौकन – पु पारितोषिक भेट
उपत्यका – स्त्री पर्वताखालची भूमि
उपदंश – पु गर्मी संसर्ग दान विषा [illegible] इंद्रियावर व्रण उत्पन्न होणारा रोग
उपदर्शक – पु [illegible]
उपनाम – पु पदवी दुसरे आडनाव टोपणनाव, उर्फ
उपनिविष्ट – वि. दुसऱ्या ठिकाणाहून येऊन वसलेला
उपनिवेश – पु वसाहत.

उपना – पु उपरणे पाघरायचा दुपट्टा (चादर)
उपपति – पु जार. यार
"जो परनारी को रसिक
उपपति ताहि बखान"
उपयम – पु विवाह संयम
उपरना – पु उपरणे. अंगवस्त्र.
उपरफट – वि वरवर उगीचच.
उपरान्त – क्रि वि नंतर
उपराचढी – स्त्री. चढाओढ स्पर्धा.
उपराला – पु पाठपुरावा चढाओढ.
उपरा-उपरी – पु चढाओढ
उपरौटा – वि वरचा.
उपलक्ष – पु. संबंध दृष्टि
उपलक्ष मे – प्रीत्यर्थ. उद्देशून.
उपला – पु गवरी.
उपली – स्त्री लहान गवरी शेणी
उपल्ला – पु वरचा पापुद्रा वरचा भाग.
उपल्ली – स्त्री वर हंतरण्याची चादर. जाजम
"सांस लेत उडिगो उपल्ला औ
मितल्ला सबै"
उपस – पु दुर्गंध
उपसाना – क्रि स शिळें करणे, सडविणे
उपसेय – पु निराहार व्रत. उपवास (जैन, बौद्ध)
उपस्थितवक्ता – पु. वचनपटु
उपस्थिति – स्त्री. अस्तित्व हजेरी
उपस्थितोत्तर – पु हजरजबाबी
उपादेय – वि उत्तम. घेण्यायोग्य
उपाधि – स्त्री पदवी उपद्व्याप
उपान – स्त्री पाया खुर्ची (खांबाची).
उपाहार – पु भेट नजराणा शकरो-पासकाचे सहा नियम हसित, गीत, नृत्य, हुडुक्कार, नमस्कार, जप.
उपालंभ – पु टोमणा
उपेक्षा – स्त्री त्याग. उदासीनता बेपर्वाई.
उफ – अव्यय – ओहो ! आह ! अरेरे !
उफुक – अ पु क्षितिज.
उफनना – क्रि अ. उमळणे. वर येणे.

**उफनाना** — क्रि स उकळविणे उसळविणे
— क्रि अ उफाळणे
**उफाल** — पु उकळी उमरा. कड
**उबकना** — क्रि अ ओकणे
**उबका** — पु दोराचा फास (घागरीचा)
**उबकाई** — स्त्री ओकारी
**उबंगी** — स्त्री स्वेटर. अगातले (उबदार)
**उबटन** — पु उटणे अभ्यग
**उबटना** — क्रि अ उटणे लावणे
**उबरना** — क्रि अ उद्धार होणे सुटका होणे वाचणे
**उबरी** — स्त्री शेतीची एक पद्धत
— वि सुटलेली उरलेली.
**उबलना** — क्रि .अ उसळणे, उकळणे
**उबल पडना** — मनातले ओकणे
**उबसन** — पु घासणी (नारळाच्या शेंडीची)
**उबाना** — पु फणीच्या वाहेरचे सूत
— वि अनवाणी
**उबार** — पु उद्धार सुटका रक्षण
**उबारना** — क्रि स उद्धार करणे मोडविणे वाचविणे [ पिण्याचे)
**उबारा** — पु कुड (जनावराचे पाणी
**उबाल** — पु कढ उकळी. आवेग. क्षोभ
**उबालना** — क्रि स उकळणे
**उबासना** — क्रि अ कळकणे घाणावणे
**उबासी** — स्त्री जाभई
**उबीठना** — क्रि स अस्वस्थ वाटणे मनातून उतरणे
— क्रि अ कटाळणे
**उबीधा** — वि खोल गेलेले कापणारे
**उभक** — पु अस्वल
**उभचुभ होना** — गटागळ्या खाणे
**उभडना** —
**उभरना** — } क्रि अ उचलले जाणे फुगणे वर येणे चिघळणे दूर होणे वयात येणे
— पु उची ओज उठाव
**उभाडदार** — वि. उठावदार भडक
**उभाडना** — क्रि स वर काढणे चढविणे वहकावणे [ लहर
**उमंग** — स्त्री. उत्साह मनीषा आनद

**उमगना** — क्रि अ. उसळणे. भरभरणे. आनदणे उडारणे
**उमगा** — वि उत्साहाच्या भरात आलेला. मर्यादा सोडलेला उडारलेला
**उमड** — स्त्री वाढ घेरा हल्ला
**उमडना** — क्रि अ उसळणे. दुथडी भरणे. क्षुब्ध होणे [ होणे.
— **घुमडना** — भरून येणे मेघाच्छन्न
**उमदगी** — अ स्त्री उमदेपणा. उत्तमता.
**उमदा** — वि चागला झकास
**उमदाना** — क्रि अ प्रमत्त होणे
**उमरती** — स्त्री एक वाद्य
**उमरी** — स्त्री सज्जी खार ज्यापासून करतात ते झाड
**उमरी** — अ पु शिष्ट मनुष्य सरदार.
**उमस** — स्त्री उकाडा [ क्षुब्ध होणे.
**उमहना** — क्रि अ उसळणे दुथडी भरणे.
**उमाह** — पु उत्साह
**उमाहल** — वि. उत्साहित
**उमेठन** — स्त्री पीळ मुरड
**उमेठना** — क्रि स पिळणे मुरगाळणे.
**उम्दा** — अ वि उत्तम. चागला
**उम्मी** — स्त्री ओबी
**उम्मीद**
**उम्मेद** } — फा स्त्री आशा. भरवसा उमेद.
- **से होना** — गर्भवती होणे
**उम्र** — अ स्त्री वय
— **कटना**
— **गुजारना** } आयुष्य कठणे दिवस काढणे
— **बिताना**
**उया** — वि वस्त्रहीन
**उरई** — स्त्री वाळा
**उरगड्डी** — स्त्री ताणा गाडण्यासाठी जमिनीत मारलेली खुटी
**उरण** — पु मेढा
**उरद** — पु उडीद (उर्द)
— **के आटे की तर ऐंठना** — अप्रसन्न होणे फुरगुटणे, गर्वाने फुगणे
**उरद के आटे की तर पर सफेदी** — नावालाच

**उरदी** – स्त्री वारीक उडीद. ताटाच्या मध्यभागी असलेले गोल चिन्ह. लोखडी ओगराळे
**उरधारना** – क्रि स विखुरणे उसवणे
**उरला** – वि मागचा विरळा अल्याडचा
**उरस** – पु. दाढीवाला वोकड (पश्चिम पजावात) छाती हृदय उर
 – वि. फिका नीटस [करणे.
**उरसना** – क्रि अ हलविणे वरखाली
**उरारा** – वि विशाल
**उराव** – पु इच्छा आकाक्षा उत्साह
**उराहना** – पु टोमणा तक्रार
**उरेह** – पु चित्रकला नक्षी
**उरेहना** – क्रि स रेखाटणे लिहिणे.
**उर्दू** – स्त्री अरवी-फारसी शब्दाचे आधिक्य असलेली आणि फारसी लिपीत लिहिली जाणारी हिंदी भाषा
 – **बाजार** – सैन्याचा वाजार मोठा वाजार
**उर्फ** – अ पु टोपणनाव
**उर्वरा** – स्त्री सुपीक भूमि
 – वि सुपीक
**उर्स** – अ पु पुण्यतिथि (इस्लामी साधूची) पुण्यतिथीचा उत्सव
**उलंग** – वि नागवा उल्लिग [पद्धति
**उलछा** – हाताने फेंकून वी पेरण्याची
**उलझन** – स्त्री गुतागुत भानगड विघ्न पेंच चिंता व्यग्रता
 – **मे डालना** – भानगडीत पाडणे पेंचात आणणे
 – **मे पडना** – अडचणीत पडणे वुचकळयात पडणे
**उलझना** – क्रि अ अडकणे, गुतणे, पेचात आवळले जाणे लपेटणे लीन होणे
 – **पुलझना** – पक्के अडकणे
**उलझा-सुलझा** – क्रि वि वेडेंवाकडें
**उलझाना** – क्रि स अडकविणे, गुतविणे आटे पाडणे वाक्यागणिक अडथळा करणे
**उलझाव**
**उलझेडा** } – पु वखेडा भानगड. अडचण.

**उलट-कवल** – पु घायपात
**उलटना** – क्रि अ उपडे पडणे पालटणे. मागे वळणे. तुटून पडणे. लोटणे (गर्दी). अस्ताव्यस्त होणे-उलटे होणे-काहीच्या काहीच होणे नष्ट होणे
**उलट जाना** – क्रि अ. वेशुद्ध पडणे मरणे. खाली पडणे गर्विष्ठ होणे. भरणे (अवयव). जनावरावर पुन्हा जनावर चढविणे
**उलटना** – क्रि स खालचे वर वरचे खाली करणे आपटणे पाडणे. उपडें करणे पालटणे फिरविणे वर टाकणे. विघडविणे घालमेल करणे चाळणे (पुस्तक)
**उलट देना** – तोंडास तोंड देणे उलटून टाकणे खोदून सारखे करणे वी जळून गेल्यावर पुन नागरणे वेहोष करणे. ओकणे ओतून टाकणे नष्ट करणे. जप करणे (व्यग)
**उलट-पलट**
**उलट-पुलट**
**उलट फेर** } – पु वदल अव्यवस्था. – वि अस्ताव्यस्त
**उलटा** – वि उपडा
 – पु विरडे आवोळी घावन.
 – **घडा बाधना** – युक्तीनें डाव उलटविणे
 – **फिरना**
 – **लौटना** } त्याच पावली परत फिरणे.
 – **तवा** – काळा कभिन्न
 – **लटकना** – प्राण देण्यास सिद्ध होणे.
 – **हाथ** – डावा हात
**उलटा चोर कोतवाल को डांटे** – चोराच्या उलटया वोवा
**उलटा जमाना** – अधाधुदी विपरीत काळ.
**उलटा सीधा** – गडवडगुडा – वेडेंवाकडें.
**उलटी टांग गले पडना** – निस्तरावे लागणे
**उलटी माला फेरना** – वाईट चिंतणे.
**उलटे कांटे तोलना** – दाडी मारणे
**उलटे छुरे से मूंडना** – मूर्ख वनवून टाकणे.

**उलटे पाँव फिरना** — आल्या पावली परतणे
**उलटे मुंह गिरना** — तोंडघशी पाडणे
**— हाथ का दाँव** — हातचा मळ.
**— पलटी** — स्त्री उलटापालट
**— माँच** — पु. जहाजाची पुच्छगति
**उलटाव** — पु फेरा पालट
**उलटी** — स्त्री ओकारी मलखाबाची एक उडी
**— कॉगसी** — स्त्री पजाबी मलखाबी उडी
**— खोपडी का** — विक्षिप्त मूर्ख
**— गगा वहना** — अनपेक्षित घडणे
**— बहाना** — रूढीविरुद्ध वागणे
**— पट्टी पढ़ाना** — भलतेच मनात भरविणे
**— बगली**
**— रुमाली** } — स्त्री जोडीचा एक हात.
**— साँस चलना**
**— साँस लेना** } शेवटला श्वास लागणे
**— सरसो** — स्त्री मत्रतत्राला लागणारी राई.
**— सवाई** — स्त्री जहाजाच्या टोकाला वाधलेला साखळदड
**— सीधी सुनना** — शिव्या खाणे.
**— सुनाना** — तासडपट्टी काढणे
**उलटे** — क्रि वि उलट उलट पक्षी
**उलथा** — पु एक नृत्यभेद. भाषान्तर
**उलथा मारना** — कोलाटी उडी मारणे वसल्या वसल्या कुशीत वळणे.
**उलफत** — अ स्त्री प्रेम प्रीति
**उलवी** — स्त्री एक मासा (याच्या पखाचा सरस बनवितात)
**उशबा** — अ पु एक रक्तशोधक वनस्पति
**उलहना** — क्रि स वाहेर फुटणे उलणे प्रफुल्लित होणे. उमलणे
— पु टोमणा तक्रार
**उलांक** — पु टपाल रुद नाव
**उलांकी** — पु डाकेचा हलकारा
**उलाना** — क्रि म हाती धरून चालविणे.
**उलार** — वि. उलाळ
**उलाहना** — पु. टोमणा. तक्रार
— क्रि स निंदा करणे टोमणा मारणे
**उलीचना** — क्रि स ओंजळ भरून फेंकणे उपसून टाकणे
**उल्लू** — पु घुबड मूर्ख अपशकुन्या
**— का गोश्त खिलाना** — गाढव बनविणे
**— बोलना** — उजाड होणे
**— सीधा करना** — स्वार्थ साधणे
**उवनि** — स्त्री उदय प्रकाश
**उशीर** — पु वाळा (पिण्याच्या पाण्यात सुवासामाठी घालतात).
**उसकन** — पु घासणी
**उसनना** — क्रि स उकळणे शिजविणे
**उसरना** — क्रि अ हरणे दूर होणे. ओसरणे
**उसरौंडी** — स्त्री एक पक्षी
**उसारा** — पु ओसरी
**उसाँस**
**उसास** } — स्त्री उसासा श्वास
**उसाँस भरना**
**उसास लेना** } — उसासा टाकणे
**उसार** — पु व्यवस्था
**उसासा** — पु उसे उशी
**उसीला** — फा पु वशिला
**उसूल** — अ पु तत्त्व सिद्धान्त नियम
**उसेना** — क्रि अ उकडणे
**उसेय** — पु जाड व उच बाबू (पाणी किंवा दूध ठेवण्यास याचा उपयोग होतो)
**उस्तरा** — पु वस्तरा
**उस्ताद** — फा पु गुरु शिक्षक.
— वि धूर्त लुच्चा निपुण
**उस्तादाना** — वि गुरूप्रमाणे.
**उस्ताना** — क्रि स जाळणे.
**उस्तानी** — फा स्त्री गुरुपत्नी शिक्षिका. लबाड स्त्री.

# ऊ

ऊंगना – पु गुराचा एक रोग
ऊगा – पु आघाडा
ऊंगी – स्त्री घेरी फेंफरे
ऊंघन – स्त्री डुलकी
ऊंघना – क्रि अ डुलकी येणे झोपणे
ऊंघासा – वि झोपाळू
ऊँच – वि उच कुलीन
ऊँचनीच – पु उच्चनीच कुलीन-अकुलीन
ऊँचा – वि उच अपरा श्रेष्ठ थोर
– नीचा–खडवडीत लाभहानि
ऊंचा – नीचा सुझाना (समझाना) – भलतेच भरवणे [ करणे
ऊँचा नीचा सोचना – लाभहानीचा विचार
ऊँचा नीचा सुनना (सुनाई देना) – कमी ऐकू येणे
ऊँचाई – स्त्री उची
ऊँचे बोल बोलना – घमेड करणे
ऊँछना – क्रि स केस विंचरणे
ऊँट – पु उट
ऊँटकटारा } ऊँटकरीरा } – पु एक काटेरी झुडुप ब्रह्मदण्डी
ऊँटवान – पु उट चालविणारा
ऊवावाई – वि निरर्थक व्यर्थ
ऊख – पु ऊस
ऊखल – पु उखळ उखळी
ऊगरा – वि उकडलेले
ऊजड – वि उजाड झालेले
ऊटपटांग – वि असवद्ध विचित्र. निरर्थक
ऊडा – पु उणीव दुष्काळ लोप
ऊडी – स्त्री विणकऱ्याची चाती वुडी. पाणकोवडा
ऊत – वि निपुत्रिक मूर्ख
– पु निपुत्रिकत्वामुळे मरणोत्तर भूतयोनीत जाणारा
– निपूता – एक शिवी निसनान.
ऊदविलाव – पु. ऊद (प्राणी)
ऊदविलाव की ढेरी – न तुटणारे भांडण.
ऊदल – पु एक वृक्ष (याच्या सालीपासून दोरखड करितात )
ऊदा – वि वैंगणी उदी रगाचा
– पु. उदी रगाचा घोडा.
ऊदीसेम – स्त्री चौधारी घेवडा
ऊधम – पु उपद्व्याप हुल्लड दगा
ऊधम उठाना (मचाना) – दगा करणे
ऊधमी – वि खोडकर दगेखोर
ऊधो – पु (कृष्णसखा) उद्धव
– का लेना न माधो का देना – अध्यात ना मध्यात
ऊन – पु लोकर खेद
– वि थोडे अपूर्ण तुच्छ.
ऊनी – वि कमी
– स्त्री लोकरीचे वस्त्र खेद उदासता.
ऊप – पु पेरणीस दिलेल्या बीजावद्दल सवाई धान्य घेण्याची रीत
ऊपर – वि वर काठी. आणि वर
– ऊपर – वरच्यावर गुपचुप
– जाना – फुकट जाणे
– की आमदनी अवातर मिळकत
– दोनो – डोळे
– छार पडना – मरणे
– तले – खालीवर क्रमाने
– के – पाठचे (भाऊ-बहीण)
– से – अवातर (लाच). वरवर.
– होना – पुढें जाणे
ऊपरी – वि वरील बाहेरील अनधिकृत.
ऊपरी तौरसे – वरवर वरकरणी.
ऊपरतलेके – ज्या दोन मुलात तिसरे मूल झालेले नसते
ऊब – स्त्री कटाळा उद्वेग उत्साह
ऊबट – पु विकट मार्ग
ऊबड – खावड – वि खडवडीत
ऊबना – क्रि अ त्रासणे कटाळणे
ऊभासाँसी – स्त्री दम (लागणे )
ऊमट – पु क्षत्रियात एक भेद
ऊमर – पु उवर वैश्यातील एक जात.

**ऊमस** — स्त्री उकाडा
**ऊमी** — स्त्री स्त्री ओवी
**ऊर** — पु धान्य पेरण्याची एक रीत. (रोपे उपटून दूर दूर लावणे )
**ऊरी** — स्त्री विणकऱ्याचे हत्यार
**ऊर्जस्वल** — वि अतिशय बलवान
**ऊलग** — स्त्री एकप्रकारचा चहा
**ऊलजलूल** — वि असवद्ध काहीतरी मूर्ख अडाणी
**ऊषा** — स्त्री झुजुमुजु उष काल.
**ऊसन** — पु खुरासणी
**ऊसर** — पु रेताड जमीन काहीही ज्यात पिकत नाही अशी भूमि
उ "ऊसर वरसै तिन नहि जामा"
**ऊह**
**ऊहन** } — पु अनुमान विघान
**ऊहापोह** — पु तर्कवितर्क.

## ऋ

**ऋजुता** — स्त्री सरळपणा सोपेपणा सज्जनता
**ऋण** — पु कर्ज
— **उतारना** — कर्ज फिटणे
— **पटना** — कर्जफेड पुरी होणे
— **मार** — कर्ज घेऊन ते परत न देणारा
**ऋत** — पु सत्य मोक्ष उञ्छवृत्तीने जीविका चालविणे
**ऋतुमती** — वि रजस्वला मासिकधर्मयुक्त
**ऋनिया** — वि देणेकरी
**ऋषीक** — पु ऋषिपुत्र

## ए

**एँच पेंच** — पु अडचण भाडण सकट
**एँडा बेंडा** — वि वेडेवाकडे भलतेच
**एँडी** — पु एक रेशमाचा किडा त्यापासून निघणारे रेशीम
**एँडुआ** — पु. चुवळ भाडयाचे वूड.
**एकगो** — वि एकटा
**एकगी** — स्त्री बोथाटी (सारखा
**एक** — वि एक (सख्या) एकटा कोणी
— **अक** —
— **आँक** — } ठरीव पक्के
— **आँख से देखना** — समभाव किवा समदृष्टि ठेवणे सारखेपणाने वागणे
— **न भाना** — तिरस्कार वाटणे
— **आध** — एखादा एकटा दुकटा
— **एक** — प्रत्येक क्रमाने
— — **करके** — एकामागून एक
— — **के दो दो करना** — काम वाढविणे उगीच वेळ काढणे
— **तरफ** — एकावाजूला एकीकडे
— **और एक ग्यारह करना** — सघटन करणे.
— **कलम** — एकदम केवळ
— **के दस सुनाना** — टाकून वोलणे
— **जान** — एकजीव
— **टाँग फिरना** — सारखे भटकणे
— **टक देखना** — रोखून पाहणे
— **ताक**
— **तार** } समान सारखे
— **दीवार रुपया** — हजार रुपये
— **दूसरा** — एकमेक
— **न चलना** — अगतिक होणे
— **पास** — जवळ जवळ
— **व एक** — एकाएकी अचानक
**एक वात** — दृढ प्रतिज्ञा
— **मामला** — एकी
— **मूठ**
— **मुश्तसे** } एका हप्त्याने एका मुठीने
— **सा** — एकसारखा

एक-गाछी – स्त्री एकाच लाकडाची केलेली नाव
एक-चोबा – फा पु एकखांबी तंबू
एकटंगा – वि एकटांग्या
एकठा – पु "एक-गाछी"
एकड – पु एकर
एकडाल – वि एकातऱ्हेचे एकसंधि
एकतरफा–फा वि एकेंपक्षी एकाबाजूचा
– डिगरी – फा स्त्री एकतरफी हुकुमनामा
एक-तरफी – पु सबंध लोखंडाचा सुरा
एक-तरा – पु एकांत्र ताप
एकतालीस – वि ४१
एकदरा – पु एकाच दाराची जागा
एकन्नी – स्त्री एक आण्याचे नाणे (नये ६ पैसे)
एकपटा – वि अखंड
एकपलिया – वि एक पाखी
एक-पेचा – फा वि एक पिळाचे
– पु एक पातळ फेटा
एक फर्दा / एक फसला –फा वि वर्षांतून एकच पीक निघणारे शेत
एकबद्धी – स्त्री दोनच आकडे असलेला नावेचा नांगर सगळेच्या सगळें
एकबारगी – क्रि वि एकदम अचानक
एकरस – वि सारखा एकाच तऱ्हेचा एकजीव [स्वीकार
एक-बाल – फा पु प्रताप भाग्य वैभव
एकरार – अ पु करार स्वीकृति प्रतिज्ञा.
– नामा – पु करारपत्र
एकलौता – वि एकुलताएक
एकवाँल – स्त्री एकच मुलाची आई
एकसत्तावाद – पु अद्वैतसिद्धान्त
एकहरा – वि एकेरी
– बदन – पु काटकुळे शरीर
एकातपत्र – वि सार्वभौम
एका – पु ऐक्य कट
एकाई – स्त्री एक घटक प्रमाण
एकाध – वि एखादा थोडासा
एकासाँ – फा वि समान तुल्य सपाट

एक्का – वि एकटा. एक घोड्याचा टांगा सेनेत मुख्याधिकाऱ्यास दिवसाचे प्रतिवृत्त देणारा सैनिक करेला (एक्का पत्यात) [पत्यात
एक्की – स्त्री एक बैलाचा छकडा एक्का.
एक्यानवे – वि ९१
एक्यावन – वि ५१
एक्यासी – वि ८१
एखनी – फा स्त्री मांसाचा रस्सा.
एड (एडी) – स्त्री टाच
एडी देना (लगाना) – लाथ मारणे घोड्यास टाच मारणे बहकावणे विघ्न आणणे [मेहनत करणे.
– चोटीका पसीना एक करना – ढोर
– चोटी पर से वारना – ओवाळून टाकणे तुच्छ मानणे
– घिसना– / – रगडना– पाय घासून घुणे दुःखात खितपत पडणे पायपिटी करणे
एडी से चोटीतक –पायापासून डोक्यापर्यंत
एतकाद – अ पु विश्वास भरवसा
एतदाल – अ पु बरोबरी नेमस्तपणा. एक राग
एतबार – अ पु विश्वास प्रतीति पत
– (किसीका) उठना – पत जाणे
– खाना – पत गमावणे
– जमना – विश्वास वसणे
एतमाद – अ पु घर स्थान
एतराज – अ पु अडथळा विरोध
एतवारी – स्त्री रविवारी द्यावयाचे दान विद्यार्थ्याने गुरुजीस किंवा मौलवीस दिलेला पैसा
एनी – पु अयणीचे झाड नी लाकूड
एमन – पु यमन राग
एराकी – फा वि इराकचा
–पु उत्तमजातीचा इराकी घोडा
एराफ / एराब –अ पु जहाजाचे बूड
एलक – पु चाळणी [दरबारी वकील
एलची – तु पु राजदूत प्रतिनिधि.
एलचीगरी – फा पु राजदूताचे कार्य

**एला** – स्त्री वेलची
**एलान** – पु घोषणा [“एवमस्तु”
**एवं** – क्रि वि तसेच आणि शेवटी
**एवज** – अ पु मोबदला प्रतिकार वदल वदली (मनुष्य)
**एवजी** – फा पु वदली काम करणारा
**एशिया** – यू पु (अशु-पूर्वदिशा तिकडील देश) आशिया खड
**एशियाई** – वि आशियामधील आशिया-सवधी
**एहतमाम** – अ पु व्यवस्था तपासणी
**एहतियात** – अ स्त्री. काळजी बचाव. सयम पथ्य
**एहतिसाब** – स्त्री परीक्षा हिशेबटिशेब.
**एहसान** – अ पु उपकार कृतज्ञता
 – **फरामोश** – वि कृतघ्न.
 – **मंद** – वि कृतज्ञ उपकृत
**एहि** – सर्व विभक्तिपूर्वी एहचे रूप “एहिते अधिक धर्म नहिं दूजा”
**एहू** (एह) सर्व हे सुद्धा

# ऐ

**ऐं** – अव्यय अ ! (आश्चर्यसूचक)
**ऐंचना** – क्रि स ओढणे ताणणे हवाला घेणे पाखडणे
**ऐंचाताना** – वि निराळा
**ऐंचातानी** – स्त्री ओढाताण
**ऐंठ** – स्त्री गर्व ऐटी द्वेष
**ऐंठन** – स्त्री पीळ अकडूपणा [पीळ
 – **उलटी** – उजवीकडून डावीकडचा
 – **सीधी** – डावीकडून उजवीकडचा पीळ
**ऐंठना** – क्रि स पीळ देणे वळणे (दोरी) मुरगाळणे तगाद्याने वसूल करणे मारणे (पैसा) उकळणे (धन)
 – क्रि अ उकळणे अवघडणे पीळ बसणे मुरडा येणे वाकडे बोलणे वळणे (हातपाय)
**ऐंठलेना** – क्रि स उपटणे (वस्तु)
**ऐंठे की वेल** – स्त्री दगडी खाबावर चारी बाजूस कोरलेला वेल
**ऐंठवाना** – क्रि स पीळ घालून घेणे
**ऐंठा** – पु दोरी वळण्याचे यत्र
**ऐंठू** – वि अकडबाज टर्रेबाज
**ऐंड** – पु गर्व ठमकारा ऐट
**ऐंड हो जाना** – फुकट जाणे मोडतोड होणे
**ऐंडदार** – वि गर्विष्ठ ऐटी
**ऐंडा** – वि तिरपा
 – पु वजन
**ऐंडाना** – क्रि अ आळेपिळे देणे
**ऐंढा** – पु एक प्रकारचा कोयता [नळी
**ऐंची** – स्त्री चडू किंवा मादक पिण्याची
**ऐजाज** – पु प्रतिष्ठा सन्मान
**ऐतरेय** – पु ऋग्वेदाचे एक ब्राह्मण आरण्यक [श्रुति
**ऐतिह्य** – पु परपराप्रसिद्ध प्रमाण लोक-
**ऐंद्रजालिक** – वि मायावी
**ऐन** – वि उपयुक्त अगदी सटीक पुरा. “साहितनय सिवराजकी सहज टेव यह ऐन” भूषण
**ऐनक** – स्त्री चष्मा
**ऐना** – पु आरसा
**ऐनि** – पु सूर्याचा मुलगा
**ऐनीता** – फा पु माकडास आरसा दाखविण्याच्या वेळचा दरवेशाचा शब्द
**ऐपन** – पु हळद नी तांदूळ ओले वाटून बनविलेले मगल द्रव्य मूर्तीच्या कपाळी तसेच घागरीवर याचा लेप करतात
**ऐब** – अ पु दोष खोड अवगुण कलक
**ऐब लगाना** – दोष देणे कलक लावणे
**ऐबी** – अ वि अपशकुनी व्यग असलेला काणा दुष्ट खोडकर
**ऐयार** – अ पु धूर्त कपटी
**ऐयारी** – अ स्त्री लटपट कपट
**ऐयश** – अ वि लपट ऐदी सुखलोलुप
**ऐयाशी** – अ स्त्री विषयासक्ति विलास

ऐराल़ – पु टरबुजासारखी काकडी (हिमालयात कुमाऊँकडे होते)
ऐरा गैरा – अ वि तिऱ्हाइत अनोळखी तुच्छ सटरफटर
ऐराव – अ पु वृद्धिवळात इरेस घालणे
ऐरेगैरे नथ्यू खैरे –} कुठला, कुणाचा,
– पचकल्याणी –} कोण
ऐश – अ पु चैन सुखविलास
ऐशू – पु गुराचा तोंड येण्याचा रोग यात गुरे रवथ करणे सोडतात

ऐशो-आराम – पु सुख चैन
ऐसा – वि असे असा
– तैसा } —सामान्य हलका अमातसा.
– वैसा }
ऐसी-तैसी – स्त्री तुच्छतादर्शक शिवी.
– करना – समाचार घेणे (व्यंग).
– मेंजाना – चुलीत जाणे (शिवी).
ऐसे – क्रि वि या तऱ्हेने
ऐसे तो – तसे म्हटले तर
ऐहिक – वि लौकिक सासारिक

# ओ

ओगना– क्रि स वगण घालणे (चाकाला)
ओगा – पु आघाडा
ओठ – पु ओठ [नागरणी
– उखाडना – पडित भूमीची पहिली
– काटना } —दात ओठ खाणे
– चबाना }
– चाटना – जिभल्या चाटणे
– चूसना – अधरचुम्बन घेणे
ओठ पपडाना } – ओठ फुटणे
– फटना }
– फडकना – सतापाने ओठ थरथरणे
— मलना – मुसकट फोडणे
ओआ – पु हत्ती पकडण्याचा खड्डा
ओकना – क्रि अ ओकारी काढणे ओकणे म्हशीसारखे रेकणे
ओकाई – स्त्री ओकारी
ओखली – स्त्री उखळी रगडा (मद्रासी)
ओखली मे सिर देना –तळहाती शीर घेणे वलिदानास सिद्ध होणे [विहीर
ओगल – पु पडित भूमि एक प्रकारची
ओघ – पु समूह ढीग प्रवाह
ओछा – वि हलका क्षुद्र किरकोळ उथळ फुसका अपरा
ओछाई – स्त्री } हलकटपणा क्षुद्रता
ओछापन – पु }
ओछी कोख – स्त्री. पोरे जगत नाहीत अशी कूस

ओझ – पु पोटाचा कोथळा पोट आतडे.
ओझर – पु जठर पोट
ओझल – वि आड अदृश्य
ओझा – पु मात्रिक सरयूपारी मैथिली नि गुजराथी ब्राह्मणातील एक जात, पचाक्षरी [ मत्रिक स्त्री
ओझाइन – स्त्री ओझाची स्त्री
ओझाई – स्त्री मात्रिकाचा धदा मत्रतत्र
ओट – स्त्री आडोसा व्यवधान आश्रय.
ओट हो जाना (आँखोसे) – अदृश्य होणे
ओटन – पु सरकी काढण्याचे यत्र
ओटना – क्रि स सरकी काढणे पुनरुक्ति करणे अडविणे अंगावर घेणे
ओटनी – स्त्री सरकी काढण्याचे यत्र. लाटणे
ओटा – पु आडोशाची भित सरकी काढणारा माणूस जात्याजवळ दळणारणीची वैठक मणी पाडण्याचे सोनाराचे यत्र
ओटी – "ओटन" पट्टा [घेणे
ओठँगना – क्रि अ टेकून वसणे विश्राति
ओडना – क्रि स अडविणे निवारणे पसरणे फैलावणे प्रसार करणे उ० "ओडिय हाथ असनिके घाये" धारण करणे
"सावधान ह्वै सोक निवारौ
ओढहु दाहिन हाथ"—सूर

**ओडव** — पु पाचही स्वराचा एक राग
**ओडा** — पु पानाची टोपली चुन्याचे माप. उणीव [घेणे
**ओढना** — क्रि स. अग झाडणे अगावर
 — पु — पाघरूण.
 **— उतारना** — अपमान करणे
 **— ओढाना** — वेश्येशी लग्न करणे
 **— गलेमे डालना** — आरोपीस न्याया-धीशापुढे नेणे
**ओढनी** — स्त्री ओढनी चुनडी.
 **— बदलना** — मैत्रिण बनविणे
**ओढरा** — पु ज्याचे लग्न झाले नाही असा पुरुष किंवा ज्याची बायको मेली असून ज्याने दुसऱ्याची बायको रखेली ठेवली आहे असा
**ओढाना** — क्रि स. झाकणे (वस्त्राने)
**ओत** — स्त्री सुख लाभ बचत ताणा
 — वि विणलेले
**ओतकसर** — पु लाभहानि
**ओतप्रोत** — वि गुफलेले एकजीव झालेले
 — पु ताणावाणा मुलीचे साटेलोटे.
**ओथरा** — वि उथळ
**ओदा** — वि ओले [गुतणे
**ओधना** — क्रि अ अडकविणे बाधले जाणे
**ओधान** — वि. लढण्यात दग होणे
**ओघे** — पु अधिकारी ठाकुरजीचा स्वय-पाकी (वल्लभसाप्रदायात)
**ओनचन** — स्त्री खाटेचे पायतण ताण-ण्याची दोरी
**ओना** — पु निकास वाहण्याचा मार्ग
**ओना लगना** — तलाव वाहून जाणे
**ओनामासी** — स्त्री प्रारभ [झिलई
**ओप** — स्त्री चमक काति सौंदर्य
**ओपची** — पु कवचधारी योद्धा
**ओपचीखाना** — पु पोलिसचौकी
**ओपनी** — स्त्री. धार लावण्याचा दगड उजाळण्याचे साधन
**ओपरापन** — पु नाविन्यामुळे आलेला चमत्कारिकपणा अपुरेपणा
**ओफ** — अव्यय. ओह उस्. (पीडा किंवा आश्चर्यदर्शक उद्गार)

**ओवरी** — स्त्री. अरुद निव्वळ कोठडी.
**ओर** — स्त्री कड बाजू दिशा पक्ष
 — पु टोक किनारा. प्रारभ
 **— आना** — अतकाळ जवळ येणे
**ओर निबाहना** }
 **— निभाना** } —कर्तव्य पूर्ण करणे
 **— पास** — क्रि वि आसपास
**ओरमा** — स्त्री. जोड कामाची शिकवण.
**ओराना** — क्रि अ समाप्त करणे
**ओरिया** — स्त्री ताणा ताणण्यासाठी गाडलेले लाकूड [अव्यय.
**ओरी** — स्त्री स्त्रियासाठी सबोधनार्थी
**ओर्रा** — पु एक उच बाबू (यापासून छत्रीच्या दाड्या करतात.)
**ओरेहा** — पु निर्माण सृष्टिरचना.
**ओलंदेज** — पु हॉलडदेशीय मनुष्य
**ओलदेजी** — वि हॉलड देशासबधी
**ओलंभा** — पु टोमणा गाऱ्हाणे
**ओल** — पु सुरण
 — स्त्री आडोसा आश्रय जामीन तारण ओलीस ठेवलेली वस्तु वा व्यक्ति वहाणा
 — वि ओले
 "लखि लाल गये करि के कछु ओल्यो"
**ओलचा** — पु ओकती (पाणी उपसण्याचे लाकडी भाडे)
**ओलची** — स्त्री आलूबालू (फळ) प्याला.
**ओलती** — स्त्री पागोळी (छपराची)
**ओलना** — क्रि स आडोसा करणे अडविणे सहन करणे टोचणे
**ओला** — पु गार (बर्फाची) खडी-साखरेचा वाटोळा खडा एक प्रकारची बाभूळ (कागडा जिल्ह्यात) आडोसा गुजगोष्ट
**ओलिक** — पु पडदा आडोसा
**ओलियाना** — क्रि स माडीवर घेणे
**ओली** — स्त्री माडी पदर झोळी पीक-पहाणीची एक पद्धत
 **— ओढना** — पदर पसरून मागणे
 **— लेना** — दत्तक घेणे.
**ओस** — स्त्री दव.

— पड जाना — } कोमेजणे उत्साहभग
— पडना — } होणे. लज्जित होणे
**ओस का मोती** — अळवावरचे पाणी
**औसर** — } स्त्री माजावर आलेली
**ओसरिया** — } पारडी
**ओसना** — क्रि स वावरणे (धान्य)
(अपनी) — सारखी वडवड करणे
(किसीको) — खूप फटकारणे
**ओसरी** (ओसरा) — पु पाळी क्रम
**ओसार** — पु विस्तार फैलाव
**ओसारा** — पु दालन सज्जा
**ओसीसा** (उसीसा) — पु उशी तक्क्या
**ओहदेदार** — फा पु अधिकारी पदाधिकारी
**ओहदा** — अ पु पद हुद्दा
**ओहरी** — स्त्री. थकवा
**ओहा** — पु गाईची ओटी कास पान्हा
**ओहार** — पु पालखीवरचा पडदा
**ओही** — सर्व त्याला तोच
"चातक रटत मृपा अति ओही"

## औ

**औंगा** — वि मुका
**औंगी** — स्त्री मौन मुकेपणा
**औंगना** — क्रि स चाकास वगण देणे
**औंजना** — क्रि अ व्याकुळ होणे
**औंटन** — पु चारा कापण्याचा लाकडी ओडा ठिय्या
**औंठ** — स्त्री जाड काठ [आणणे
— उठाना — पडितभूमि लागवडीस
**औंठा** — पु पायातील एक दागिना
**औंडा** — वि गभीर गूढ
**औंधा** — वि उपडा खाली (दृष्टि) गाडू
**औंधी खोपडीका** — मूर्ख निर्बुद्ध [पाणी
**औंधे घडेपर पानी** — पालथ्या घागरीवर
**औंधे मुंह** — खाली डोके वर पाय
— — गिरना चागलीच थप्पड खाणे तोडघशी पडणे
**औंधाना** — क्रि स उघडें करणे टागणे
**औ** — अव्यय आणि (प्रा प)
**औकन** — स्त्री ढीग (विशेषत दाणे काढून घेतलेल्या ज्वारीच्या कणसाचा)
**औकात** — अ पु वेळ
— स्त्री वेळ शक्ति परिस्थिति
**औखा** — पु गाईचे कातडे
**औगत** — स्त्री दुर्दशा
**औगी** — स्त्री दोरी वळून वनविलेला कोरडा बैल हाकण्याची छडी पराणी नक्षीदार जोडयाचे वरचे कातडे हिंस्र पशु पकडण्याचा वरचा खड्डा
**औघड़** — वि अविचारी लहरी.
**औघर** — वि अवघड उलटसुलट विलक्षण.
**औचक** — क्रि वि एकाएकी
**औचट** — वि साकडें सकट अडचण
— क्रि वि अचानक
**औचिती** — स्त्री औचित्य उपयुक्तता.
**औछ** — स्त्री दारूहळदीचा गड्डा
**औजड** — वि अडाणी
**औजार** — अ पु अवजार साधन
**औझड** } — क्रि वि. एकसारखे निरतर
**औझर** }
— मारना } फडाफड तडाके देणे
— लगाना }
**औटन** — स्त्री ताव (देणे) तवाखू चिरण्याची सुरी [भटकणे.
**औटना** — क्रि स आटविणे उकळणे
— क्रि अ आटणे आळणे
**औटनी**, — स्त्री पळी झारा [पणा
**औटपाय** — पु भामटेगिरीची कामे दुष्ट-
**औटाना** — क्रि स आटविणे उकळविणे
**औटी** — स्त्री गाय व्याल्यावर देण्यात येणारे पौष्टिक अन्न पाणी घालून उकळलेला उसाचा रस
**औढर** — वि लहरी ओढाळ
**औतारी** — वि विचित्र
**औदरिक** — वि खादाड
**औदात** — वि पाढरा [मिळालेले
**औदान** — पु फुकटचे "या भावात"

**औघ मोहरा** – पु डोके उचलून चालणारा हत्ती
**औनिछता** – पु औरगजेव [अधिक
**औनापौना** – वि पाऊण अपूर्ण कमी
**औने पौने करना** – येईल त्या किंमतीस विकून टाकणे
**औपनिवेशिक** – वि वसाहतीचे
**औपयिक** – वि. न्याय्य उपयुक्त
**औवट** – वि दुर्गम, वाईट मार्ग
**और** – अव्यय आणि
वि दुसरा आणखी निराळे विशेष
**– क्या और** – काहीच्या बाहीच (झाले)
**– क्या** – हो तर ! नाही तर काय ! !
**– तो और** – ते तर राहोच वाकीचे राहिले
**– लो –** } घ्या !
**– सुनो –** } वघा !
**– से और** – काहीच्या काहीच
**– ही (कुछ) होना** – विपरीत होणे.
**औरत** – अ स्त्री बायको बाई स्त्री
**औरेब** – पु वाकडी चाल तिरपा काट-पेच डावपेच
**औल** – पु जगली ज्वर
**औलाद** – अ स्त्री सतति वश
**औला–मौला** – वि मोळामाळा लहरी.
**औलिया** – अ पु सिद्धपुरुष (मुसलमानी).
**औवल** – अ वि पहिला मुख्य सर्वोत्तम.
– पु प्रारम
**औसत** – अ पु सरासरी
**औसना** – क्रि अ खाण्याची वस्तु शिळी होऊन सडणे काहिली होणे व्याकुळ होणे
**औसर** – पु सधि [प्रसगावधान.
**औसान** – पु अत परिणाम शुद्ध धैर्य.
**– उडना –** }
**– खता होना –** } मति भ्रष्ट होणे धैर्य गळणे
**– भूलना –** }
उ० "छूट औसान मान सकल धनजयके"
**औसाना** – क्रि स आढीत घालून पिकविणे.
**औहत** – स्त्री अपघात अपमृत्यु
**औहाती** – वि सौभाग्यवती

# क

**कंक** – पु पाढरी घार जामदार आवा (फार मोठा) यम क्षत्रिय वगळा
**कंकड** – पु चुनखडी खडा भाजलेली तवाखू कणी
**– पत्थर** – केरकचरा खडे काटे
**ककडी** – स्त्री कण
**ककडीला** } – वि रेताड खडे-काटे
**ककरीला** } असलेला
**कंकरीट** – स्त्री कॉंक्रीट
**ककतरी** – स्त्री रोडा
**ककाल** – पु हाडाचा सापळा.
**– काली** – शकर
**ककाली** – पु नीच जाति
– वि दुर्वल सैतान
– स्त्री कर्कश स्त्री
**ककेर** – पु खाण्याचे पान (कडवट)
**ककोल** – पु ककोळ
**कंकौआ** – पु पतगाची फिरकी
**कँखवारी** – स्त्री खाकमाजरी
**कँखौरी** – स्त्री खाक
**कगन** – पु वागडी कडें
**– बोहना** – पजा मिळवणे
**(हाथ) – को आरसी क्या ?** हातच्या काकणाला आरसा कशाला ?
**कँगना** – पु ककण बाधताना म्हणा-वयाचे गाणे
**कँगना** – स्त्री एकप्रकारचे गवत
**– खेलना** – हाराडेरा (लग्नविधि)
**कँगना** – स्त्री लहान वागडी छपराखाली भिंतीवर बनविलेली नक्षी कॉर्निस
– हुक्क्याच्या नळीच्या तोडाला बावलेले फडके दाते असलेले गोल चाक.

**कँगनी** – स्त्री राळा काग (धान्य)
**कँगनी-दुमा** – वि गाठी असलेल्या शेंपटीचा शेपटात गाठ असलेला (हत्ती) (अपशकुनी)
**कँगला** – वि निर्धन दरिद्री
**कँगसी** – स्त्री पजा पकड
**कँगाल** – पु भिकारी दुष्काळपीडित
**– गुडा –** / **– वाँका –** } मवाली दरिद्री असून गर्विष्ठ गरीब, शोकी व वदमाष
**कँगूरा** – पु शिखर बुरूज कगोरा
**कँघा** – पु कगवा भरणीचे ताणे कसण्याची विणकराची फणी
**कघी** – स्त्री फणी वेह्ळा (जगली झाड)
**– चोटी** वेणीफणी शृगार
**कघेरा** – पु फण्या वनविणारा कारागीर
**कचन** – पु सोने सपत्ति घोतरा रक्तकाचन
**कंचन** – वि निरोगी सुदर
**– वरसना** – सर्वसमृद्धि असणे.
**कंचन पुरुष** – पु सोन्याचा टाक. (वीराचे स्मरणार्थ) [ एक जात
**कंचनिया** – स्त्री काचनाच्या झाडाची
**कंचनी** – स्त्री प्राय वेश्यावृत्तीच्या स्त्रियाची एक जात
**कचुकी** – स्त्री अगी (अगातील चोळी)
– पु राणीवशातील दासीचा मुख्य द्वारपाळ माप
**कंचेरा** – पु काचकाम करणारा
**कंछप** – स्त्री टहाळा डहाळी
**कंजई** – वि धुरकट रगाचे घारा
– पु खाकी रगाचा डोळा असलेला घोडा
**कंजड** – पु बुदेलखडाची अनार्यजाति
**कंजर –** / **कंजरी –** } स्त्री कोल्हाटीण
**कंजा** – पु करज (झाड), करजाची वी
– वि गडद खाकी रगाचे
**कंजियाना** – क्रि अ निखारे निवणे कोमेजणे
**कंजूस** – वि कृपण कजूष
**कजूसी** – स्त्री. कजूपपणा
**कँटवाँस** – पु मरीव काटेरी वेळू.
**कंटर** – इ पु काचेची सुरई (अत्तराची)
**कटा** – पु बागडचा रगविण्याची दीड वितीची काठी
**कंटाइन** – स्त्री डाकीण कर्कशा.
**कंटाप** – पु कोणत्याही वस्तूचा जड भाग
**– दार** – पुढील भाग जड असलेला
**कटाल** – पु घायपात वेळू
**कँटिया** – स्त्री खिळा मासे पकडण्याचा गळ (विहिरीतून वस्तु काढण्याचा) आकडा डोक्यात घालण्याचा एक दागिना
**कँटीला** – वि काटेरी
**कँटूनमेंट** – इ स्त्री सैनिक छावणी
**कँटेला** – पु बारीक लाव केळ्याचे झाड
**कंटोप** – पु माकडटोपी
**कठ** – पु गळा
**– फूटना**– स्पष्ट वर्णोच्चाराचा प्रारभ तारुण्याचे आगमन व तदनुसार स्वरपरिवर्तन होणे
**– करना** (मे रखना) पाठ करणे
**– मे होना** – थोडे कमी स्मरण होणे
**कँठला** – पु ताईत
**कंठस्थ** – वि तोडपाठ
**कंठा** – पु कठा (पोपटाचा) हसळी. कठा गळा (वस्त्राचा)
**कंठाग्र** – वि तोडपाठ
**कंठी** – स्त्री माळ कठी हसळी
**– उठाना** – शपथ घेणे
**– देना** – शिष्य करणे माळ घालणे
**– लेना** – माळ घेणे त्यागी बनणे
**कंठीरव** – पु सिह
**कंदरा** – पु डिंगरी [ रक्तवाहिनी
**कडरा** – स्त्री नाडी (शरीरातील) मोठी
**कंडा** – पु गोवरी शेणी सरकडा
**– होना** – दुबळें होणे मरणे
**कंडारी** – पु कर्णधार
**कंडाल** – पु शिग (वाजविण्याचे) पाजणी करताना ताणा पसरण्याची कँची घगाळ
**कंडी** – स्त्री शेणी वाळलेला गुवाचा पोह

१२. अन्धा बगूला कीचड खाय -- आवळा वगळा चिखल खातो अडाण्याच्या हाती लागणार काय ?

१३. अन्धा बाँटे रेवड़ी फिरफिर (अपनो) अपने ही को (दे) -- आधळा रेवडीचा प्रसाद वाटतो पुन' पुन आपल्याच माणसाना देतो. सत्ता हाती आली की आपल्याच नातेवाइकाना अधिकारी नेमतो जावई ब्राह्मण, मुलगी सुवासिनी (सवाष्ण)

१४ अन्धासिपाही, कानी घोडी, विधिने खूब मिलायी जोडी -- आधळा सैनिक, काणी घोड़ी ब्रह्मदेवाने खूप जमविली जोडी. मराठीने केला कानडी भ्रतार। एकाचे एकास कळेना ते ॥

१५ अन्धी पीसे कुत्ता खाय -- आधळी दळते, कुत्रे पीठ खाते

१६. अन्धी बाँटे जवेरी, पीछे बखरा खाय -- आवळी दोरी वळते. मागें कुत्रें खाते

१७ अन्धे के हाथ बटेर लगी -- आधळचाला लावा पक्षी सापडला बोला फुलाला गाठ

१८ अन्धे को अन्धा कहनेसे बुरा मानता है -- आधळचाला आधळें म्हटलेले खपत नाही

१९ अन्धे को अन्धेरे में बहुत दूर की सूझी -- आधळचाला अधारात फार दूरचे सुचले मूर्खाच्या तोडी सरस्वती वसली

२० अन्धेरी नगरी चौपट (गड़ू) राजा, टके सेर भाजी, टके सेर खाजा -- अधेराची (अन्यायाची) नगरी, सर्वनाश (गाडू) राजा, टक्क्यालाच भाजी नि टक्क्यालाच खाजा (एक मिठाई) अनागोदी कारभार

२१ अन्धो में (अन्धनमे) काना राजा -- आधळचात काणा राजा वासरात--लगडी गाय शहाणी शून्यामध्यें आकडा (इ)

२२ अकेला पूत कमाई करे, घर का करे या कचहरी करे -- एकटा मुलगा कमाई करील, घरचे करील की कोर्ट कचेरी सभाळील ? खाती तोडें फार एकटयानें कुठे कुठे नाचावे ?

२३ अकेला चना भाड़ नही फोड सकता -- एकटचा हरभऱ्याने भट्टी फुटत नाही एकटयानें सर्व काही होत नाही

२४ अक्ल बडी की बहस (भैंस) -- ज्याची अक्कल मोठी त्याचे व्याख्यान मोठें (त्याची म्हैस मोठी) शक्तीपेक्षा युक्ति श्रेष्ठ ? बुद्धि श्रेष्ठ की तर्क ! " मतिरेवबलाद्गरीयसी "

२५ अक्लमद को इशारा, मूर्ख को तमाचा -- शहाण्याला सूचना, मूर्खाच्या--मुस्कटीत. शहाण्याला शब्दाचा मार, मूर्खाला टोणप्याचा.

२६ अच्छा करो अच्छा पावो -- उत्तम पेरणी करा, उत्कृष्ट पीक मिळवा

२७ अच्छा किया खुदानें, बुरा किया बन्देने -- देवाने भले केले भक्ताने--वाईट केले देवाने दिले, कर्माने नेले

२८. **अच्छे घर बयाना दिया** —— चागल्या घरी वयाणा दिला बलवतास आव्हान. गाडीत नाही गू नि कावळचाला आमत्रण. सूर्यावर थुकणे

२९ **अटका बनिया देय उधार** —— अडला वाणी उधार देई अडला नारायण गाढवाचे पाय धरी

३० **अटकेगा सो भटकेगा** —— जो अडकेल तो भटकेल "सशयात्मा विनश्यति"

३१ **अति और नारायणसे बैर है** —— अतिशयतेशी नारायणाचे वैर आहे आवाक्या-वाहेर काम वाईट

३२ **अति का भला न (बोलना) बरसना, अति की भली न चुप्प** —— अतिशयोक्तीचे वोलणे चागले नाही आणि अगदी गप्प वसणेही चागले नाही ' अतिसर्वत्रवर्जयेत् '

३३ **अति भक्ति चोर का लक्षण** —— अतिशय भक्ति हे चोराचे लक्षण गोगल गाय पोटात पाय

३४ **अवजल गगरी छलकत जाय, भरी गगरिया चुप्पे जाय** — पाण्याने अर्धवट भरलेली घागर हिसळत जाते तुडुंव भरलेली घागर न साडता जाते उथळ पाण्याला खळखळ फार गगा सथ वाहते व ओहोळ खळखळ वाजतो. " अर्धोघटोघोषमुपैतिनूनम् "

३५ **अधेला न दे, अधेली दे** —— अधेला देणार नाहीस, अधेली देशील उष्टचा हाताने कावळा हाकावयाचा नाही, पण कचाटचात सापडला की हवे ते देईल.

३६ **अनमागे मोती मिले, मागे मिले न भीख** — न मागणाऱ्याला मोती मिळेल, मागून भीकसुद्धा मिळणार नाही सतुष्ट नि भाग्यवानाच्या घरी हवे ते चालत येते आणि अभाग्याला मागून मिळत नाही

३७ **अनहोत मे औलाद** — खायला नाही तेथे मुले फार

३८ **अनोखे गाँव मे ऊंट आया, लोगोंने समझा परमेश्वर आया** — ज्या गावी पूर्वी कधीही उट आला नाही अशा गावी उट आल्यावर लोकाना वाटले की परमेश्वर आला। " कधी नव्हे उट पाहिला। वाटे परमेश्वर अवतरला "

३९ **अपन पेट हाऊ, मै न देहौं काहूँ** — मला माझे पोट भरायचे आहे मी दुसऱ्याला काही देणार नाही स्वार्थापुढे काही दिसत नाही

४० **अपना पूत सभी को प्यारा** — शेवडें असले तरी आपले पोर साऱ्यानाच आवडते कुभाराला आपले प्रत्येक मडके वहारीचे वाटते (इ)

४१ **अपना अपना कमाना अपाना अपना खाना** — आपण आपले मिळविणे नि आपण आपले खाणे जो तो आपल्यापुरतेच पाहतो दुसऱ्याचे काही का होईना " आत्मानस्तु कामाय सर्वं प्रिय भवति "

४२ **अपना (घर) दूर से सूझता है** — आपले (आपल्या घरचे) लावून सुचते.
(१) आपला स्वार्थ सगळचाना कळतो. (२) प्रसग पडला की मायेची माणसे आठवतात

४३. **अपना पैसा खोटा, परखैय्या का क्या दोष ?** – आपला पैसा खोटा, पारख करणाऱ्याचा काय दोष ? आपला दाम खोटा, दुसऱ्याला बोल का लावावा ?

४४. **अपना लाल गँवाय के दर दर माँगे भीख** – आपला लाल (रत्न) घालवून दारोदार भीक मागतो हातचे घालविले आणि आता दुसऱ्या पुढें तोंड वेंगाडतो हातचे सोडून पळत्याच्या पाठीमागे लागणे

४५ **अपना वही जो आवे काम** – प्रसंगी उपयोगी पडेल तोच आपला

४६. **अपना हाथ जगन्नाथ** – आपला हात, जगन्नाथ

४७ **अपनी अपनी खाल में सब मस्त है** – आपापल्या आवरणात सर्व धुंद आहेत "शेणामाजी वाघुनि वाडे नादति शेणकिडे"

४८ **अपनी अपनी डफली अपना अपना राग** – आपली टिमकी अन् आपलाच राग जो तो आपल्याच तोऱ्यात कोणाचा पायपोस कोणाच्या ताब्यात नाहीं

४९. **अपनी करनी पार उतरनी** – करावे तसे भरावे करील तो भरील

५०. **अपनी कौख का पूत नौसादर** – (नौसादर – नौसागरक्षार). पोटचा (सख्खा) मुलगाच पाग फेडील

५१ **अपनी गरज को लोग गधा चराते हैं** – **अपनी गरज बावली होती है** – स्वत ला गरज असली म्हणजे लोक गाढवाला चारा घालतात. आपली गरज वेडी असते गरजवंताला अक्कल नाही अडला नारायण गाढवाचे पाय धरी. "हा नारायण अडला । पायी गद्ध्याच्या पडला ।।

५२. **अपनी गली मे कुत्ता भी शेर होता है** – स्वतःच्या गल्लीत कुत्रासुद्धा वाघ बनतो

५३ **अपनी टाँग उधारिये, आपहिं लाजो मरिये** – आपली मांडी उघडी टाका नि आपणच लाजेने मान खाली घाला आपलेच दात नि आपलेच ओठ (आपल्या देशाची निंदा आपणच केली तर हसू आपलेच होते )

५४ **अपनी मर्यादा अपने हाथ** – स्वत स्वाभिमानाने रहा मग दुसरेही तुम्हाला मान देतील

५५ **अपनी नाक कटाकर (कटे तो कटे) दूसरे का असगुन मनाना (सगून तो बिगडे** – आपले नाक कापून घेऊन (कापले गेले तर गेले) दुसऱ्याला अपशकुन साजरा करणे (दुसऱ्याला शुभशकुन तर होणार नाही ) आपले नाक कापून दुसऱ्याला अपशकुन जे का व्यर्थ परार्थहानि करिती ते कोण की दुर्मति ।।

५६ **अपनी पगडी अपने हाथ** – आपली पगडी आपल्या हाती. आपली पत आपल्या हाती आत्मैवत्यात्मनो बधु ।।

५७ **अपनी बुद्धि पराया धन, कई गुना दीखता है** – आपली बुद्धि नि दुसऱ्याचे धन नेहमी मोठीच वाटतात

५८ **अपने ऐब सब लीपते हैं** – आपले उणे सारेच लपवितात

५९ **अपने घर में आना किस को बुरा लगता है ?** – आपल्या घरी येण्याला कोणाला वाईट वाटते ? मिळाले तर कोण सोडते ?

६०. **अपने दही को खट्टा कौन कहता है ?** – आपल्या दह्याला आंबट कोण म्हणतो ? आपल्या मालाला वाईट कोण म्हणणार ?

६१ **अपने पाँवो आप कुल्हाड़ी मारना** – स्वत च्या पायावर स्वत कुऱ्हाड मारणे. स्वत च्या पायावर धोंडा पाडून घेणे "आत्मैवरिपुरात्मन "

६२ **अपने पूत को कोई काना नहीं कहता** – आपल्या मुलाला कोणी चकणा म्हणत नाही आपल्या मुलाला वाईट कोण म्हणेल ? "नैवाश्रितेषु गुणदोष विचारणा स्यात् "

६३ **अपने मरे बिना स्वर्ग नहीं दीखता** – आपण मेल्यावाचून स्वर्ग दिसत नाही

६४. **अपने मुंह मियाँ मिठ्ठू** – आपण आपुली करी स्तुति मूर्ख स्वत ला साधू समजतो

६५. **अब की बार बेडा पार** – या वेळी नि झालाच उद्धार आणखी एक वेळ प्रयत्न करा, तुम्हाला यश मिळेलच

६६ **अब पछताये होत क्या चिडिया चुग गई खेत** – आता पस्तावून काय होणार ? पक्षी शेत खाऊन गेले सधि जाता निघोनी । काय होय पस्तावोनी ?

६७ **अबरा की जोरू ( गरीब की लुगाई ) सब की भौजाई** – दुबळ्याची ( गरिबाची ) बायको साऱ्याची वहिनी गरिबाला सारेच धनी कोणीही काम सांगावे.

६८ **अबलौं नसानी अब न नसै हो** – बहुत मोशिले मार्गे न कळता । पुढती काय आता अध व्हावे ।।

६९. **अभी तो तुम्हारे होठो का दूध भी नहीं सूखा** – अजून तर तुमच्या ओठावरचे दूधही सुकले नाही ओठ पिळला तर दूध निघेल अजून

७० **अभी तो तुम्हारे दूध के दात भी नहीं टूटे** – अजून तर तुझे दुधाचे दातही पडले नाहीत "ओठाच्या वरचाहि जार अजुनी नाही तुझ्या वाळला "

७१ **अमीर को जान प्यारी, गरीब को दम भारी** – श्रीमताला जीव प्यारा, गरिबाला श्वास भारी श्रीमत म्हणे अमर असावे । गरीब म्हणे ( मार्गे ) देवा सोडवावे ।।

७२ **अरहर की टट्टी गुजराती ताला** – तुराटयाची पडवी ( झोपडी ) तिला गुजराथी कुलूप

७३ **अल्लाहही की चोरी नहीं तो बन्दे का क्या डर** – देवाची चोरी नाही तर भक्ताचे काय भय ? कर नाही त्याला डर कशाला ?

७४ **अवसर को कबहीं गँवाओ** – लोखड तापवून लाल झाले आहे तोवरच त्याला ठोका.

७५ **अशर्फियाँ लूटें और कोयलोपर मुहर ( छाप )** – मोहोरा लुटविती आणि कोळशावर मोहोर पुढचे दार उघडे नि मोरीला डुच्चा (पेनी वाइज् पाउड फुलिश )

७६ **अस्सी की आमद चोरासी का खर्च** – ऐंशीची प्राप्ति, चौऱ्यायशीचा खर्च !

## आ

७७ **आँख ओट, पहाड ओट** – डोळ्याआड न दिसे पहाड । दृष्टिआड सृष्टि

७८ **आँख और कान में चार अंगुल का फर्क है** – डोळे नि कान यात चार बोटाचे अंतर असते
७९ **आँख के अन्धे नाम नयनसुख** – डोळयानी आंधळा आणि नाव काय तर म्हणे 'नयनसुख' नाव सोनूबाई हाती कथलाचा वाळा.
८० **आँख के आगे पलकों की बुराई** – डोळयापुढें पापण्याची निंदा ? आपल्याच एका मित्राजवळ दुसऱ्या मित्राची निंदा करणे वाईट
८१ **आँख फूटी, पीर गई** – डोळा फुटला, दुखणे गेले
८२ **आँखों देखी न कानो सुनी** – न डोळा देखिले न कानी ऐकिले पाह्यल ना ऐकले !
८३ **आँखों देखी चेतना मुँह देखे व्यवहार** – डोळयाने पाहिले तर विश्वास, तोंड पाहिले तर व्यवहार प्रत्यक्षावाचून विश्वास वाटत नाही परिचयावाचून व्यवहार होत नाही
८४ **आँख न दीदा, काढे कसीदा** – डोळे न दृष्टि म्हणे कशीदा काढते ओ म्हणता ठो कळेना म्हणे मी शिकविती.
८५. **आँख बची माल दोस्तो का** – लक्ष नसले की माल मित्राचा. "आपली वस्तु आपण राखावी । दुर्लक्ष होता परिचित नागवी ।।
८६ **आँखो में चर्वी छायी है** – डोळयात चरबी पसरली आहे डोळयावर धुंदी आली आहे (सत्तेमुळे, पैशामुळे)
८७. **आँख से दूर, दिल से दूर** – डोळयापासून दूर, मनापासून दूर डोळयाआड, स्मशान पाड दूर राहिले की प्रेम कमी होते
८८. **आग लगनेपर कुवाँ खोदना उचित नहीं** – आग लागल्यावर विहीर खणणे योग्य नाही घोडा चोरला गेल्यावर तबेल्याला कुलूप लावण्यात काय हशील ?
८९ **आँत भारी तो माथ भारी** – आतडे जड तर डोके जड फार पोट भरले की आळस येतो डोके जड होते
९० **आँधी के आम** – वावटळीने पडलेले आंबे स्वस्तात मिळालेली वस्तु.
९१ **आँसू एक नहीं, कलेजा टूक टूक** – एकही अश्रु नाही आणि म्हणे काळीज धडधडते आहे डोळयाला नाही आसू, गेली सख्खी सासू
९२ **आग खाना अगार हगना** – आग खावी निखारे हगावे. करावे तसे भरावे
९३ **आयी तो रोजी नहीं तो रोजा** – मिळाली तर रोजी (मजुरी) नाही तर रोजा (उपवास)
९४ **आयी है जान के साथ, जायगी जनाजे के साथ** – काया (शरीर) प्राणासंगे आली ती तिरडीसंगे जाईल
९५ **आग लगन्ते झोपड़ा, घो निकले सो सार** – आग लागली झोपडयास जरी । जें निघाले तेचि बहुपरी ।। "सर्वनाशेसमुत्पन्ने अर्धं त्यजति पंडित "
९६ **आग लगे (लगने) पर कुआँ खोदना** – आग लागल्यावर विहीर खोदणे, "संदीप्ते भवने तु कूपखननं प्रत्युद्यम कीदृश "
९७ **आगे कुआँ पीछे खाई** – पुढें विहीर मागे खंदक इकडे आड तिकडे विहीर "इतो व्याघ्र इतस्तटी "
९८. **आगे दौड़ पीछे चौड** – पुढे धाव, मागें सत्यानाश पुढे पाठ मागे सपाट.

९९ आगे नाथ न पीछे पगहा, सबसे भला कुम्हारका गदहा – पुढें नाही वेसण, मागे नाही दावे, (खरोखर) कुमाराचे गाढव उजवे (सरळ) आगा न पीछा एकटा फटिंग

१०० आगे रोक पीछे ठोक – पुढे बंद दार, मागें हग्या मार (निसटण्यास सोय नाही)

१०१ आज किधर का चाँद निकला ? – आज कुठें चंद्र उगवला ? आज हा पश्चिमेला सूर्य कसा उगवला ?

१०२ आज के बनिये कल के सेठ – आजचे वाणी, उद्याचे शेठ. आज अत्तवाणी तर उद्या पालखीचा धनी

१०३ आजादी खुदा की नियामत है – स्वातंत्र्य परमात्म्याची दुर्लभ देणगी आहे

१०४ आटेका चिराग, घर रखूं तो चूहा खाय, बाहर रखूं तो कौवा ले जाय – कणकेचा दिवा घरात ठेविला तर उंदीर खाईल व बाहेर ठेवला तर कावळा नेईल इकडे आड तिकडे विहीर

१०५ आटे (गेहूँ) के साथ घुन भी पीसता (पीसा जाता) है – कणकेबरोबर किडेही दळले जातात सुक्याबरोबर ओलेही जळते

१०६ आटे दाल की फिक्र – कणिक डाळीची चिंता पोटाची चिंता

१०७ आता हो तो उसे हाथ से जाने न दीजै, जाता हो तो उसका गम न कीजै – येत असेल तर त्याला हातून जाऊ देऊ नये जात असेल तर त्याचे दुःख करू नये

१०८ आती लक्ष्मी को कौन लात मारता है ? – येत्या लक्ष्मीला कोण लात मारतो ?

१०९ आत्मा मे पडे तो परमात्मा सूझे – आत्म्याला मिळाले तर परमात्मा सुचेल भरल्या पोटी वेदान्त सुचतो

११०. आदमी की दवा आदमी है – माणसाचे औषध माणूस "उद्धरेदात्मनात्मानम्"

१११ आदमी की पेशानी दिलका आईना है – माणसाचे कपाळ हृदयाचा आरसा आहे

११२ आदमी जाने बसे, सोना जाने कसे – मनुष्याची परीक्षा बसल्याने (संगतीत राहिल्यानें), सोने पारखावे कसल्याने (कसोटीनें)

११३ आदमी पेट का कुत्ता है – मनुष्य पोटाचा दास आहे "अर्थस्य पुरुषो दासः"

११४ आधा तीतर आधा बटेर – अर्धा तित्तिर पक्षी अर्धा लावा पक्षी गंगा-जमनी थाट धड हे नाही, धड ते नाही

११५ आधी को छोड सारी को धावे, आधी रहे न सारी पावे – अर्धी सोडून सगळीच्या मागे धावतो, अर्धी जाते नि सगळीही मिळत नाही भावी आशेनें निश्चित सोडू नका (इ)

११६ आप काज महा काज – आपले आपण काम केले तरच उत्तम होते

११७ आप भला तो जग भला – आपण चांगले वागलो तर जगही चांगले वागेल

११८. आप सुखी तो जग सुखी – आपण सुखी तर जग सुखी

११९ आप मरे जग परलै – आपण मेलो, जग बुडाले

१२० आप मरे बिना स्वर्ग नहीं मिलता – स्वतः मेल्यावाचून स्वर्ग दिसत नाही

१२१ आपही हारे बहू को मारे – स्वतः हरले नि सुनेला मारले. वड्याचे तेल वांग्यावर

१२२ **आपही मिया मँगते, द्वार खडे दरवेश** – स्वत भिकारी नि द्वारावर दरवेशाची ललकारी

१२३ **आब आब कर मर गये सिरहाने रक्खा पानी** – आव आव वोवलत राहिले, पाणी उशाशी तसेच राहिले (स्वभाषा-द्रोही अहमन्यास लागू)

१२४ **आब गया, आदर गया, गया सुपारी पान, लै लुगड़ी ठाढ़े भये खुषी भये जजमान** – प्रतिष्ठा गेली, आदर गेला, पान सुपारी गेली, वोचके घेऊन निघाले, यजमान आनदित झाले

१२५. **[illegible]** – येरे भुता, माझ्या गळा पड येरे घोड्या, पड माझ्या डोक्यान

१२६ **आंब, ईख, नींबू, वणिक्, गारे ही रस देत** – आवा, ऊस, लिवू, वाणी याना पिळले की रस देतात

१२७ **आम के आम गुठली के दाम** – आवेच्या आवे नि वर कोयाचे पैसे–कामात काम

१२८ **आम खानेसे काम, पेड गिननेसे क्या काम?** – आवे खाण्याशी काम, झाडे मोजण्याची काय जरूर ? पायावर पाणी घाल तर म्हणे साखळ्या केवढ्याच्या

१२९ **आमो की कमाई नींबूमें गवाई** – आम्यात कमावले ते लिवात गमावले. एकात मिळविले तर दुसऱ्यात घालविले रमारमी झाली

१३० **आया कुत्ता खा गया, तू बैठी ढोल बजा** – कुत्रा आला, खाऊन गेला तू बसलीस ढोलके वाजवीत (गाणे गात)

१३१ **आया है सो जायगा राजा, रंक, फकीर** – साधू, राजा, भिकारी, जन्माला आला तो मरायचाच "जातस्य हि ध्रुवो मृत्यु" ।

१३३ **न आये की खुषी, न गये का गम** – आल्याचा आनद नाही, गेल्याचे दुःख नाही (समाधानी मनुष्य)

१३४ **आय थे हरिभजन को, ओटन लगे कपास** – हरिभजनासाठी आले, कापूस पिंजू लागले आली होती जेवायला, लागली स्वयपाकाला

१३५ **आस पास बरसे; दिल्ली पडी तरसे** – आसपास पावसाच्या सरी,, दिल्लीला टिपूस नाही हवे त्याला एक नाही, नको त्याला लेढार

१३६ **आसाढ मे खाद खेत में जावे, तब मुठ्ठीभर दाना पावे** – आषाढात खत पडे शेती। तेव्हा मूठभर दाणे येतील हाती

१३७ **आहारे व्यवहारे लज्जा न कारे** – आहारात व व्यवहारात सकोच करू नये आहारे व्यवहारे च त्यक्तलज्ज सुखी भवेत् ।।

## इ

१३८ **इक तै एक दईके लाल** – एकापरीस एक भाग्याचे थोर "वहुरत्ना वसुधरा"

१३९ **इतना झूठ बोले जितना आटे में नोन** (व्यापारात) लाभ किती घ्यावा, जितके कणकेत मीठ

१४०. **इतनीसी जान और गजभर की जबान** – इवलासा जीव नि दोन हात जीभ कालचे पोर नि काय लब्ध्या वाता झोकतोय

१४१. **इस घरका बाबा आदम ही निराला है** – या कुळाचा मूळपुरुष काही निराळाच आहे. (आदम – विश्वातील पहिला मनुष्य) याचे सगळेच विचित्र आहे "मुरारेस्तृतीयः पथा"

## ई

१४२. ईंट की लेनी, पत्थर की देनी – वीट घेतली तर दगड द्यायलाच हवा. (योग्य प्रतिकार) एक बोलले तर दहा ऐकावे लागेल

१४३ ईखतक खेती, हाथीतक बनीज – उसान्त शेती, गजान्त श्रीमती उसाच्या शेतीपुढे शेती नाही हत्तीच्या व्यापारापुढे व्यापार नाही

१४४ ईश्वरेच्छा बलीयसी – परमेश्वराच्या इच्छेपुढें कोणाचे चालत नाही

१४५ ईश्वर की माया, कहीं धूप कहीं छाया – देवाची माया कुठे ऊन कुठें छाया

१४६ अँधाते को ठेलते का वहाना – झोपाळू माणसाला धक्का लागण्याचे निमित्त. आपला दोष झाकायला दुसऱ्याचे निमित्त

१४७ डेढ या ढाई ईंट की मस्जिद अलग बनाना – सर्व लोक जे म्हणतात किंवा करतात, त्याच्या उलट वागणूक करणे

## उ

१४८ उखली मे सर (सिर) दिया तो मुसलो से क्या डर ? उखळात डोके ठेविले मग मुसळाची भीति कशाला ? "जे दिव्य दाहक म्हणोनि असावयाचे बुद्ध्याचि वाण धरिले करिं हे सतीचें"

१४९ उतर गयी लोई तो क्या करेगा कोई – एकदा अंगावरची शाल निघाली खरी, मग आता कशाला कोणाला भ्यायचे ? एकदा प्रतिष्ठा गेली। आता कोणाची लाज आली ?

१५० उत्तम खेती, मध्यम बान, नीच चाकरी, भीख निदान – उत्तम शेती, मध्यम व्यापार, कनिष्ठ चाकरी, शेवटी भिकार

१५१ उपदेश करने से स्वय करना भला – लोका सागे ब्रह्मज्ञान आपण कोरडे पाषाण उपदेशापेक्षा कृति श्रेष्ठ

१५२ उधार का खाना और फूस का तापना बराबर है – उधारीचे खाणे नि गवताची आग, दोन्ही सारखीच (किती वेळ टिकणार ?)

१५३ उधार दिया, गाहक खोया – उधार दिले, गिऱ्हाइक घालविले

१५४ उन्नीस-बीस का तो फर्क होता ही है – किंचित् फरक असायचाच (या जगात अगदी सारखा स्वभाव जमणे अशक्य )

१५५ उपजहिं एक संग जलमाहिं, जलज जोक जिमि गुण बिलगाहिं –
।। जळ कमळहि पाण्यात जन्मतात । किती अंतर दोहिंच्या परि गुणात ! ! " ।।

१५६ उलटा चोर कोतवाल को डांटे – उलट चोरच कोतवालाला (फौजदाराला) दम देतो चोराच्या उलटचा बोबा

१५७ उलटे बॉस बरेली को – उलट बरेलीलाच वेळू (नेता) ! (बांस-बरेली असे त्या गावाचे नावच पडले आहे कारण तेथे वेळूची वने आहेत) प्रयागला गंगा नेता ? कोकणात नारळ नेता ! न्यूकॅसलला कोळसा नेता

## ऊ

१५८ ऊची दुकान, फीका पक्वान – प्रसिद्ध दुकान, फिके पक्वान नाव मोठें लक्षण खोटे मेंढ्याची ओरड फार पण लोकर तोळाभर

१५९. ऊट का मुंह क्या जाने किधर उठे – उंटाचे तोंड कुणाकडे वळेल काय सागावे ? वरचोट प्राणी केव्हा काय करील कोण जाणे !

१६० ऊट किस करवट बैठता है – उट कोणत्या कुशीवर वळणार ? काय होतें तें पहावे. ।। तुका म्हणे उगा राही । जें जे होईल ते ते पाही ।।
१६१ ऊट की चोरी और झुके झुके – उटाची चोरी नि वाकत वाकत ? मोठी कार्यें गुपचुप होत नाहीत
१६२. ऊंट के ऊंटही रहे – उटाचे उटच राहिले, गगेत राहून कोरडे
१६३ ऊट के मुह में जीरा – उटाच्या तोंडात जिरे दर्यामे खसखस सागरात जलबिंदु
१६४ ऊंट रे ऊंट तेरी कौन सी कल सीधी – उटा रे उटा ! तुझी कोणती बाजू सरळ रे ? अष्टावक्र नऊचक्र रोमारोमात कपट
१६५ ऊख करे सब कोई, जो बीच में जेठ न होई – मध्यें जेष्ठ नसता (कडक उन्हाळा नसता) तर सगळ्यानी ऊसच पेरला असता.
१६६ ऊधो का देना न माधो का लेना – उद्धवाचे घेणे नाही माधवाचे देणे नाही. घेण नास्ति, देण नास्ति
१६७ ऊचे बोल का बोल नीचा – घमेडखोर माणमाचे डोके खालीच !

# ए

१६८ एक अंडा वह भी गदा – एकच अडें नि तेही खराब ! एकुलता एक मुलगा नि तोही दुर्गुणी
१६९ एक अनार सौ बीमार – डाळिंब एक, रोगी अनेक. वस्तु थोडी, मागणी फार
१७० एक आम की दो फांके – एकाच आंब्याच्या दोन फाका एकाच माळेचे मणि (चांगल्या अर्थी)
१७१ एक और एक ग्यारह होते है – एक नि एक अकरा होतात
१७२. एक कहो और दस सुनो – एक बोलले तर दहा ऐकावी लागतात
१७३ एक के दुने से सौके सवाये भले – एकाचे दोन होण्यापेक्षा शभराचे सवापट बरे ।। थोडा लाभ अधिक विक्री । ही व्यापाराची गुरुकिल्ली ।। थोड्यात गोडी फारात लबाडी
१७४ एक चुप हजार को हरावे – (वेळेवर) चुप बसणारा हजाराना हारवितो "मौन सर्वार्थ साधनम्"
१७५ एक तन्दुरुस्ती हजार नियामत – एक आरोग्य, तर सहस्र दुर्लभ देणग्या. आरोग्य सर्व सुखाचे मूळ आहे "शरीरमाद्य खलु धर्मसाधनम्"
१७६ एक तवे की रोटी, क्या पतली क्या मोटी – एकाच तव्याची भाकरी, जाड काय नि पातळ काय ।। उडदामाजी काळे गोरे । काय निवडावे निवडणारे ।
१७७ एकता में बल है – एकीत सामर्थ्य आहे संघे शक्ति कलौयुगे
१७८ एक तो कडवा, दुसरे नीमचढा – आधीच कारले कडू, वर (कडू) लिंबाचे पूट आधीच मर्कट तशातहि मद्य प्याला ।।
१७९ एक तो चोरी, दुसरी सीना जोरी – चोर तर चोर नि वर शिरजोर
१८० एक तो भीख, दुसरे पछोर पछोर – एक तर भिक्षा, आणि ती पाखडून पाहिजे अन्नछत्री जेवणे नि वर मिरपूड मागणे
१८१ एक थैली के चट्टे-बट्टे – एकाच पिशवीतील नाणी एकाच माळेचे मणी

१८२ **एक दम में हज़ार दम** – एका श्वासात हजार श्वास एकाच्या जिवावर हजारोंचे जीवन

१८३ **एक दिन मेहमान, दो दिन मेहमान, तीसरे दिन बलाएँ जान** – एक दिवस पाहुणा, दुसऱ्या दिवशी पाहुणा व तिसऱ्या दिवशी जिवावरचें सकट पहिल्या दिवशी पाहुणा, दुसऱ्या दिवशी पै तिसऱ्या दिवशी राही त्याला अक्कल नाही दोन दिवस पाहुणा, तिसऱ्या दिवशी लाजलावणा

१८४ **एक दिन सबको मरना है** – एक दिवस सर्वांनाच मरायचे आहे मरण प्रकृति शरीरिणाम् ।। कवीतरी मरण यायचेंच

१८५ **एक फूल से माला नहीं बनती** – एका फुलाची माळ होत नसते

१८६. **एक न शुद, दो शुद** – एक पुरे झाले नाही दुसरे ! संकटें एकटी येत नाहीत

१८७ **एक नागिन अरु पंख लगाई** – आधी नागिण, त्यात तिला पख आधीच नाचरे नि त्यात भरले वारे.

१८८ **एक पंथ दो काज** – एका दगडानें दोन पक्षी मारणे "एकाक्रिया-द्वयर्थकरी प्रसिद्धा"

१८९ **एक सडी मछली सारे जल को गंदा करती है** – एक सडलेला मासा (फडफडून) सारे पाणी गढूळ करितो सडका आबा सारी आढी नासवतो

१९० **एक म्यान में दो तलवारें नहीं समा सकती** – एका म्यानात दोन तलवारी रहात नाहीत

१९१ **एक हाथसे ताली नहीं बजती** – एका हाताने टाळी वाजत नाही भाडण करायला दोन लागतात

१९२ **एडियाँ रगडते दिन कटाई करना** – अत्यत हालात दिवस कठणे

## ऐ

१९३ **ऐंचन छोड़ घसिटन में पड़े** – पेंच मोडवायला गेले नि फरफटण्यात सापडले, भाडण सोडवायला गेले नि मारामारीत सापडले

१९४ **ऐब-करने को भी हुन्नर चाहिये** – खोडसाळपणा करायलासुद्धा डोके लागते

१९५ **ऐसे गये जैसे महफिलसे जूता** – असे नाहीसे झालात, जसे सभेंतून जोडे गुपचुप पसार झालात शिताफीने झुकाडी दिलीत

१९६. **ऐसे कौन, लोभ नहिं जाके** – ज्याला लोभ नाही असा कोण आहे ?

१९७ **ऐसे बूढे बैल को कौन बाँध भुस देय** – असल्या म्हाताऱ्या बैलाला बाधून ठेवून कोण कडवा घालणार ?

## ओ

१९८ **ओछा पात्र उबलता है** – (पातळ) उथळ भाडें उकळू लागते

१९९. **ओछे की प्रीति, बालू की भीत** – हलक्याची प्रीत नि वाळूची भिंत टिकणार नाही

२०० **ओछे के मुंह लगना अपनी इज्जत खोना** – हलकटाच्या तोंडी लागणे म्हणजे आपली प्रतिष्ठा गमावणे आहे

२०१ **ओस चाटे प्यास नहीं बुझती** – दवबिंदू चाटल्यानें तहान भागत नाही दात कोरून पोट भरत नाही चिलटाचें ढुगण धुवून कढी होत नाही पल्याच्या वाऱ्यानें धुके विरत (विरघळून जात) नाही.

## औ

२०२ **औधे घडे का पानी मूरख की कहानी** – पालथ्या घागरीवर पाणी, मूर्खाची कहाणी (कोणाच्याही उपयोगाचे नाहीत)

२०३ **और दिनो की खीर-पूरी, पर्वके दिन दाॅल निपोरी** – इतर दिवशी खीर पुरी, सणाच्या दिवशी ह्यॅं ह्यॅं करी ।। इतर वारी चैन करी । पाहिजे तेव्हा नाही घरी ।।

२०४. **और बात खोटी सही दाल रोटी** – इतर वाया गोष्टी, खरी डाळ-रोटी (भाजी भाकरी) सारे जग पोटाच्या मागे लागले आहे

२०५. **औसर का चूका आदमी और डाल का चूका बंदर नहीं संभलता** – संधि गमावलेला माणूस नि फादीवरून निसटलेले माकड सावरत नाही

## क

२०६ **ककडी के चोर को फाॅसी नहीं दी जाती** / **ककडीके चोर की गर्दन नहीं काटी जाती** – काकडीच्या चोराला फाशी देत नाहीत त्याचा कोणी शिरच्छेद करीत नाहीत

२०७ **कगाली मे आटा गीला** – आधी दारिद्र्य, त्यात कणिक भिजली (खरकटी झाली) एकामागून एक आपत्ति "गडस्योपरिपिटिका सवृत्ता"

२०८ **कढाईसे गिरा चूल्हे में पडा** – कढईतून निसटला नि चुलीत पडला ! आगीतून निघून फुपाट्यात पडणे

२०९ **कब्र का मुंह झाॅककर आये हैं** – थडग्यात डोकावून आले आहेत मृत्यूच्या जवड्यातून परत आले आहेत

२१० **कभी घी घना, कभी मूठभर चना, कभी वह भी मना** – कधी तुपाचा मारा, कधी मूठभर हरभरा, ( कधी तोही नाही) कधी उपाशी मरा

२११. **कद्र खो देता है हरबार का आना जाना** – वारवार येण्याजाण्यानें मान जातो अतिपरिचय खोटा, मान राहात नाही

२१२ **कभी नाव गाडीपर, कभी गाडी नावपर** – केव्हा नाव गाडीवर तर केव्हा गाडी नावेवर

२१३ **कम खर्च वालानशीन** – थोड्या खर्चात उत्तम शोभा

२१४ **कमानका निकला तीर और मुंहसे निकली बात वापस नहीं आती** – धनुष्यापासून सुटलेला बाण नि तोंडातून निघालेला शब्द परत येत नाही

२१५ **करघा छोड जुलाहा जाय, नाहक चोट बिचारा खाय** – माग सोडून साळी जाई, उगीचच थप्पड बिचारा खाई।। लष्कराच्या भाकरी भाजणे नसते उद्योग करणे

२१६ **करनी खाक की, बात लाखकी** – करणी कवडीची, वाता लाखाच्या, छटछाट

२१७ **कर बुरा हो बुरा** – कराल तसे भराल वाईट कराल तर भविष्यात तुमच्यासाठी वाईटच वाढून ठेवलेले आहे

२१८ **करम प्रधान विश्व रचि राखा, जो जस करहिं सो फल चाखा** – "कर्म प्रधान विश्व हे रचिले । फळ भोगावे जैसे केले"
२१९. **करमहीन खेती करे, मरे बैल या सूखा पड़े** – अभागी शेती करी, बैल मरे किंवा अवर्षण पडे वरी ।
२२० **कर्जदार, छातीपर सवार** – घेणेकरी छातीवर स्वार घेणेकरी सारखा सतावतो.
२२१ **कर सेवा पा मेवा** – सेवा कर नि मिठाई खा
२२२ **करे कल्लू, भरे लल्लू** – कल्लूने करावे नि लल्लूने भरावे "दशाननोऽहरत्सीता । बधनच महोदधे ।।"
२२३ **कल का जोशी गाड में जटा** – अर्ध्या हळकुडात पिवळा
२२४ **कलाल की दूकानपर पानी भी पीओ तो शराब का गुमान (शक) होता है** – कलालाच्या दुकानी पाणी जरी प्यालात तरी दारूचा सशय येतो कलालाच्या दुकानी दूध प्याले तरी लोकाना दारूचा सशय येतो शिंदीच्या झाडाखाली प्यायले दूध, लोक समजतात ताडी
"पयोऽपि शौडिकी हस्ते वारुणीत्यभिधीयते"
२२५ **कहते है उदपूर को, लेकिन जाते है महमूदपूर को** – तोडाने म्हणतात उदेपूरला पण जातात मात्र महमदपूरला ! बोलणे एक करणी कसाबाची.
२२६ **कहने से करना भला** – सागण्यापेक्षा करणे बरे "य क्रियावान् स पडित ।।
२२७ **कहाँ राजा भोज कहाँ गगा (गागू) तेली** – कुठे राजा भोज, कुठे गगा (गागू) तेली ! कुठे इद्राचा ऐरावत, कुठे शामभट्टाची तट्टाणी
२२८ **कहीं की ओट कहीं का रोडा, भानुमतीने (का) कुनबा जोडा** – कुठली वीट अन् कुठला रोडा घेऊन भानुमतीनें घर बाधले कुठले कुठे नि उठूउठू भेटे
२२९ **कहेसे कुम्हार (धोबी) गधेपर नहीं चढता** – आपल्या सागण्याने कुभार गाढवावर बसणार नाही हट्टी माणूस कोणाचे ऐकणार नाही
२३० **कागज़ की नाव आज न डूबी कल डूबी** – कागदाची नाव, आज नाहीं तर उद्या बुडणार ही निश्चित गोष्ट आहे
२३१ **कागज की नाव नहीं चलती** – कागदाची नाव चालत नाही मातीचे कुल्ले किती वेळ टिकणार ?
२३२ **काजल की कोठरी में हू सयानी जाय, एक रेख (लीक) काजल की लागि है पै लागि है** – काजळाच्या कोठीत कितीही शहाणा गेला तरी त्याच्या अगास एक तरी काजळाची रेघ लागणारच चिखलात दगड टाकला तर चिखल अगावर उडणारच
२३३ **काजीजी दुबले क्यो ? शहर के अंदेशे से** – काजी (न्यायाधीश) असे सुकलात का ? (म्हणे) गावच्या चितेनें !
२३४ **काटा और उलट गया** – चावला नि उलटला ( साप चावून उलटला म्हणजे विष चढते ) वचन दिले नि आता फिरला
२३५ **काँटे से काँटा निकलता है** – काटचाने काटा काढावा लागतो दुष्ट माणसाचे पारिपत्य दुष्टाकडून व तसलेच उपाय योजून करावे लागते
२३६ **काठ की हाँड़ी बारबार नहीं चढती** – लाकडाची हडी (माताचे तपेले) पुन्हा ( चुलीवर ) ठेवता येत नाही. एकदा फसला म्हणून वारवार फसत नसतो

२३७ कान छिदाय सो गुड खाय – कान टोचील तो गूळ खाईल आधी कष्ट मग फळ

२३८ काबुल में क्या गधे नहीं होते – काबुलमध्ये गाढवे का नसतात ? गाव तेथें उकिरडा

२३९ कानी के ब्याह को नौसों जोखिम – नकटीच्या लग्नाला सतराशे विघ्नें

२४० काम का न काज का दुश्मन अनाज का – कामाचा न काजाचा, शत्रु अन्नाचा !

२४१ काम को काम सिखाता है – कामाला काम शिकविते, जात्यावर बसले की ओवी सुचते कामच कामकरी तयार करिते

२४१(अ) काम जो आवे कामरी, का ले करे कुमाच – कांबळे काम भागवते. रेशमी (वस्त्र) कशाला हवे ?

२४२ काम न धंदा, तीन रोटी बंदा – काम न धंदा, तीन वेळा खायला हवे.

२४३ काम प्यारा है चाम प्यारा नहीं – काम प्यारे असते चामडे प्यारे नसते दिसायला चांगली नि कामाला भागली, उपयोग काय ?

२४४ का वर्षा जब कृषी सुखाने । समय चूकि पुनि का पछताने – पिके सुकल्यावर पाऊस काय करावयाचा ? वेळ निघून गेल्यावर पश्चात्ताप काय कामाचा ? अपान वायु सरल्यावर गाड आवळून काय उपयोग ? ("चौरेगते वा किमु सावधानम्" "वयसिगते कः कामविकारः"

२४५ काला अक्षर भैंस बराबर – काळें अक्षर आणि म्हैस सारखीच. ओ म्हणता ठो कळेना (अक्षर शत्रु) चतुर्थ श्रेणीचे (ट, ठ, ड, ढ)

२४६ कासा दीजे, वासा न दीजे – भाडेकुर्डे या रहायला जागा देऊ नका. अपरिचिताला वाटले तर जेवायला घाला, पण घरात थारा देऊ नका.

२४७ किया चाहे चाकरी, सोया चाहे घर – चाकरी तर पाहिजे आणि इकडे घरी तर खुशाल झोपतो

२४८ किया चाहे चाकरी, राखा चाहे मान – चाकर म्हणून रहावे, म्हणे मला राव म्हणा !

२४९ किस खेती की मूली – कुठल्या शेताचा मुळा? कोणत्या झाडाचा पाला?

२५०. किसी की कुछ नहीं चलती जब तकदीर फिरती है – दैव एकदा फिरले की मग कुणाचे काही चालत नाही ।। होणारे न चुकेल होईल जरी ब्रह्मा तया आडवा ।।

२५१ कुएँ की मिट्टी कुएँ में ही लगती है – विहिरीची माती विहिरीच्याच कामाला येते चरवीतील दूधच सडाना लावितात

२५२ कुचाल सग हाँसी, जीवजान की फाँसी – दुष्टासवे थट्टामस्करी, लागे गळ्याला दोरी

२५३. कुछ कमान झुके कुछ गोसा – धनुष्य काही वाकते काही प्रत्यचा (दोरी) वाकते कार्यसिद्धीसाठी दोघानाही थोडे थोडे सोडावे लागते

२५४ कुछ खोकर ही (सीखते है) अक्ल आती है – काही गमावल्यानतरच अक्कल येते टाकीचे घाव सोसावे तेव्हा देवपण येते

२५५ कुछ नहीसे थोडा भला – काहीच नसल्यापेक्षा थोडेसे मिळाले तरी चागले – सबंध भाकरी मिळाली नाहीतर चतकोर ही सही

२५६. कुत्ता भी जब बैठता है, दुम हिलाकर – कुत्राही शेपूट हालवून (जागा स्वच्छ करून) बसतो (घाणेरडेपणा करणाऱ्याला म्हणतात )

२५७ **कुत्ता भोके काफिला सुवारे** – कुत्रा भुकतो (लमाणाचा) तांडा (खुशाल) चालतो कोणी निंदा कोणी वंदा। आपुला स्वहिताचा धंदा।।

२५८ **कुतिया- चोरो निल गयी, पहरा किसका है** – कुत्री चोराना सामील झाली, पहारा कमचा करणार? रक्षक तो भक्षक झाला

२५९ **कुत्ते की दुम बारह वर्ष नल में (नलवे में) रखी तो भी टेढी की टेढी** – कुत्र्याचे शेपूट बारा वर्षं नळीत घालून ठेविले तरी वाकडें ते वाकडेंच ! !
"नलिकागतमपि कुटिल न भवति सरल शुन पुच्छम ।।

२६० **कुत्ते को घी हज़म नहीं होता** – कुत्र्याला तूप पचत नाही
हलक्या माणसाला सत्ता; ज्याला त्याला मारी लाथा ! !

२६१ **कुत्ते के भोकने से हाथी नहीं डरते** – कुत्र्याच्या भुकण्याला हत्ती भीत नाही

२६२ **कुनबेवालो के चारो पल्ले कीचड में है** – मोठ्या कुटुंबाच्या लोकाची चारी (पदर) टोके चिखलात आहेत मोठ्या कुटुंबात नेहमी सोयर-सुतक अडी-अडचणी चालूच असतात

२६३ **कुम्हार अपना घडा ही सराहता है** – कुंभार आपल्या घड्याचीच प्रशसा करितो-माकड म्हणतें माझीच लाल

२६४ **कूकर भूखे लाख हजार, हाथी घूमे हाट-बाजार** – कुत्री कितीही भुकली तरी हत्ती खुशाल बाजारात हिंडत असतो

२६५ **कै हसा मोती चुगे कै भूखे मर जाहिं** – हंस मोती तरी टिपून खातील, नाहीतर उपाशी तरी मरतील थोर व्यक्ति आपले थोरपण सोडीत नाहीत
"किं जीर्णं तृणमत्ति मानमहतामग्रेसरः केसरी ।।"

२६६ **कोई आँख का अंधा कोई हिये का अंधा** – कोणाचे डोळे आंधळे, कोणाचे हृदय आंधळें कोणाला चर्मचक्षु नसतात, तर कोणाला ज्ञानचक्षु नसतात

२६७ **कोइरी के गाँव धोबी पटवारी** – कोइरी गावात धोबी तलाठी (कोइरी गावचे धोबी हिशेब करण्यात पटाईत असतात)

२६८ **कोई मरे कोई जीवे, सुथरा घोल बतासा पीवे** – कोणी मरो नाहीतर तरो, हा आपला बत्तासे घालून शुद्ध भाग पिणार "कोणी काही म्हणा। लाज नाही आमुच्या मना।"

२६९ **कोउ नृप होउ हमें का हानि, चेरि छोडि नहि होउब रानी** – कोणी होईंना राजा, आपले काय जाणार? (मी) दासी आहे ती राणी थोडीच होणार?

२७० **कोठेवाला रोवे, छप्परवाला सोवे** – गच्चीवाला रडतो, छप्परवाला झोपतो, श्रीमंत चोराच्या भीतीनें जागतो गरीब स्वस्थ झोप घेतो.

२७१ **कोयला होय न उजला सौ मन साबुन होय** – कोळसा शंभर मण साबणाने धुतला तरी पाढरा होणार नाही कोळसा उगाळावा तितका काळाच

२७२ **कोयले के दलाली में हाथ काले** – कोळशाच्या दलालीत हात काळे

२७३ **कौआ चला हंस की चाल, अपनी चाल भी भूल गया** – कावळा हंसासारखा चालायला गेला तर स्वतःची चालही विसरला हैवही गेले नि दैवही गेले
"इदं च नास्ति न परं च लभ्यते ।।"

२७४ **कौनसी चक्की का पीसा खाया है** – कुठल्या जात्यानें दळलेले खाल्ले? (अति-लठ्ठ माणसाला म्हणतात.)

२७५ क्या पानी मथनेसे घी निकलता है — पाणी घुसळून तूप थोडेच निघणार?
२७६ क्या पिदड़ी क्या शोरबा — चिमणीचे पिल्लू ते केवढे! नि त्याचे कालवण किती होणार? अल्पप्राप्तीत सदा ओढगस्ती!
२७७ क्या मुँहसे फूल झडते है!! — काय तोंडातून फुले पडताहेत? काय मुक्ताफळें निघताहेत तोंडावाटे
२७८ कफन को कौडी न रखना — सारी कमाई खर्च करून टाकणे
२७९ कल कभी नहीं आता -- गेला दिवस पुन्हा येत नाही

## ख

२८० खग जाने खग की भाषा — पक्ष्याला पक्ष्याची भाषा कळते
२८१ खर को गंग न्हवाइये तऊ न छाँडे छार — गाढव गंगेत न्हाले नि उकिरड्यावर जाऊन लोळले मूळ स्वभाव जाईना
२८२ खर गुड एकही भाव — गवत नि गूळ एकाच भावात! अंधेर नगरी
२८३ खरबूजे को देखकर खरबूजा रंग पकडता है — (शेजारचे) खरबूज पाहून खरबूज आपला रंग ठरविते एकाचे पाहून दुसरा करू लागतो
२८४ खल्क की ज़बान खुदा का नक्कारा — जननेची जीभ म्हणजे नारायणाचा नगारा
२८५ खाइये मनभाता, पहनिये (हँडाइये) जगभाता — (आपल्या) मनास आवडेल ते खावे, जनास आवडेल ते ल्यावे
२८६ खाओ वहाँ तो पानी पिओ यहाँ — तेथे जेवा नि येथे पाणी प्या जेवत असाल तर हात धुवायला येथें या
२८७ खाक डाले चांद नहीं छिपता — राख फेंकून चांदोबा लपत नाही आकाशावर थुकले तर स्वत च्याच तोंडवर येते.
२८८ खात निंबोरी दाख बतावे — लिंबोण्या खातो पण द्राक्षें सांगतो. (फुकटची मिजास)
२८९ खाने के दांत और, दिखाने के और — खायचे दात निराळे नि दाखविण्याचे दात निराळे!
२९० खाने को पीछे, नहाने को पहले — खायला मागें, आंघोळीला आधी प्रथम स्नान नंतर भोजन
२९१ खाय सो पछताय, न खाय सो पछताय — खाईल तो पस्तावेल, न खाईल तो पस्तावेल (विषयोपभोग घेणे नि त्यागणे दोन्ही दु खदायक)
"न च खलु परिभोक्तु नैव शक्नोमि हातुम्"
२९२ खाल ओढाय सिंह की, स्यार सिंह नहीं होत — सिंहाचे कातडं पांघरविल्यानें कोल्हा सिंह बनत नाही
२९३ खिचडी माँगे चार यार, दहीं, पापड, घी, अचार — खिचडी म्हणे बोलवा चार मित्र (कोणचे?) दही, पापड, तूप नि लोणचे
२९४ खिलाये का नाम नहीं, रुलाये का नाम — खायला घातल्याचे नाव नाही. रडविले म्हणून ओरड चांगले केले ते विसरतात नि थोडा त्रास झाला की आरडाओरड (मूल-दुसऱ्याचे-सांभाळण्यात)
२९५ खिसियानी बिल्ली खंभा नोचे — चिडलेले मांजर खांबालाच ओरबाडते

२९६ **खीर में नोन डाल दिया** – खिरीत मीठ टाकले. दुधात मिठाचा खडा

२९७ **खुदा गंजे को नाखून न दे** – देवाने टकल्याला नखे देऊ नयेत "सत्ता सुखरत अधमाला" कधी न मिळो

२९८ **खुशामद से (ही) आमद है** – पुढे पुढे करणे नि आपले पोट भरणे

२९९ **खून लगाकर शहीदों में मिलना** – अंगास रक्त लावून हुतात्मा म्हणून मिरविणे

३००. **खुंटे के बल बछडा कूदे** – खुंटाच्या जोरावर गोऱ्हा उड्या मारतो मोठ्याच्या घरचे श्वान

३०१ **खूब गुजरेगी जो मिल बैठेंगे दिवाने दो** – समानशील मिळाले, त्याचे जगच निराळे

३०२ **खेती खसम शेती** – शेती, धनी लक्ष घालील तरच वाढते

३०३ **खेती पाती बीनती और घोडे का तंग। अपने हाथ सवारिये चह लाखो हो संग** – शेती, पान, प्रार्थना नि घोड्याचा तंग। आपल्या हाताने सावरावी जरी लाखो असती संग।। (चांगले काम हवे असेल तर ही चार इतरावर सोपवू नयेत)

३०४ **खैरात के टुकडे, बाजार मे डकार** – भिकेचे तुकडे खायचे नि बाजारात ढेकरा द्यायच्या ! मागून आणायचे नि दिमाख दाखवायचा !

३०५ **खोटा बेटा और छोटा पैसा भी समयपर काम आता है** – वाईट मुलगा नि चोपडा पैसासुद्धा वेळेवर उपयोगी पडतो

३०६ **खोदा पहाड (और) निकली चुहिया** – डोंगर पोखरून उंदीर निघाला

३०७ **खरी मजूरी चोखा काम** – नगद मजुरी आणि इमानीचे व चोख काम

## ग

३०८ **गंगा गये गंगादास, जमुना गये जमुनादास** – गंगेला गेले गंगादास झाले, यमुनेवर गेले यमुनादास

३०९ **गंजी यार किस के, दम लगाया खिस के** – टकल्या कुणाचा मित्र, झुरका मारला की पसार

३१०. **गई सो गई, अब राख रहीकी** – गेले ते गेले, आहे ते सांभाळ

३११ **गधा खेत खाय और जुलाहा मारा जाय** – गाढवाने शेत खाल्ले, मारला गेला साळी एकाचा अपराध नि भलत्याला दंड चोराऐवजी सन्याशाचा बळी

३१२ **गधा धोने से बछडा नहीं होता** – गाढवाला न्हायला घालून ते गोऱ्हा होत नाही गाढवी गंगेत न्हायली तरी अपवित्रच राहिली

३१३ **गया वक्त फिर हाथ नहीं आता** – गेलेली वेळ पुन्हा हाती लागत नाही संधि गेली की गेलीच

३१४ **गये थे रोजा छुडाने (उलटी) नमाज गले पडी** – रोजा (मुसलमानी नक्त-उपवास) सोडायला गेले तर उलट प्रार्थना गळ्यात पडली (नमाज–प्रार्थना चालविणे)

३१५ **गयी मांगने पूत, खो आयी भरतार** – पुत्र मागायला (देवीकडे) गेली आणि नवरा घालवून बसली

३१६ **गरीब की हाय बुरी है** – गरिबाचा तळतळाट वाईट.

३१७ गरीब तेरे तीन नाम, झूठा, पाजी, बेइमान – गरिबा ! तुझी नावे तीन असती। खोटा, पाजी, विश्वासघातकी. गरीब गाईच्या पाठीवर कोणीही थाप मारावी

३१८ गरीबने रोजे रखे तो दिन ही बडे हो गये – गरिबानें नक्त केले तर दिवसच मोठा झाला दारिद्रय सर्व अडचणींचे माहेरघर आहे

३१९ गवाह चुस्त, मुद्दई चुस्त – साक्षीदार पक्का, वादी निश्चिन्त (पैसे घेऊन खोटी साक्ष देणाऱ्यासाठी)

३२० गाँठ में जमा रहे तो खातिर जमा रहे – गाठी धन असल्यावरी। चिंता कशाची ही न करी।।

३२१ गाडर पाली ऊन को, लागी चरन कपास – लोकरीसाठी मेंढी पाळली, ती कापूसच चरायला लागली, सुखासाठी पाळला, जीव घेऊ लागला

३२२ गाय मारकर जूता दान – गाय मारायची नि पादत्राणाचे दान करायचे हरिभाऊला देण्यासाठी जनूभाऊला लुटायचे (इ)

३२३ गाल कट जाये, पर चावल न उगले – गाल तुटेल पण भाताचे शित बाहेर निघणार नाही जीव गेला तरी हट्ट सोडणार नाही

३२४ गीदडी की शामत आये तो गाँव की तरफ भागे – कोल्ह्याच्या जिवावर बेतली तर तो गावाकडे वळतो "विनाशकाले विपरीत बुद्धि :"

३२५ गुड खाय, गुलगुलोसे परहेज – गूळ खातो नि गुलगुल्याचे (पाकलेले चिरोटे) पथ्य करतो उगीचच ढोंग

३२६ गुड़ दिये मरे तो जहर क्यो दे – गूळ दिल्याने, मरतो मग विष का द्या ?

३२७ गुड न दे गुडकिसी बात तो करे – गूळ देऊ नका, गुळासारखें गोड तर बोलाल।

३२८ गुड़ गुड़ ही रहे, चेला चीनी हो गये – गूळ गूळच राहिला शिष्य साखर झाला गुरूपेक्षा शिष्य सवाई

३२९. गेहूँ भवा काहे, सोलह दाय बाहें – गहू कसा तरतरला सोळा वेळ नांगर फिरला

३३० गोकुल से मथुरा न्यारी – गोकुळ नि मथुरा यात महदंतर आहे कशाचा कशाशी मेळ नाही

३३१ गोद में बैठकर आँख में उंगली – कडेवर बसतो नि डोळयात बोट खुपसतो. उपकाराची फेड अपकारानें

३३२ गोद में लडका शहर भर ढिंढोरा – कडेवर मूल गावभर दौडी हातात कळसा नि गावाला वळसा कठगत चामीकर न्याय

३३३ गोबर गिरा तो कुछ लेकर ही उठेगा – शेणाचा पोह पडला तर काहीतरी घेऊन उठेलच धनकोने धरणे धरले तर त्याच्या तोंडावर काहीतरी टाकलेच पाहिजे

३३४ गोबर, मैला, नीम की खली, याते खेती दूनी फली – शेण, सोनखत, कडुलिंबाची (लिंबोण्याची) पेंड याने शेती दुप्पट होते

३३५. (उलटे) रोजे गले पडे – चांगले काम बिघडून गेले

३३६ गाना उस की जिस का खाना – ज्याची खावी पोळी, त्याची वाजवावी टाळी.

३३७ गुड़ खाय गुलगुले से छूत – गूळ खायचा नि पक्वान्नाचे पथ्य खोटें ढोंग

## घ

३३८ घड़ीभर की बेशर्मी दिनभर का आराम – घटकाभरची नि स्पृहता दिवसभर सुख एकदा स्पष्ट सांगितले की पुन्हा कटकट नाही. आधी कडू मग गोड

३३९ घड़ी में घर जले, ढाई घडी भद्रा – एका घटकेत घर जळते अडीच घडी भद्रा (शुभ मुहूर्त), वेळ चालली निघून, म्हणे आता देऊ मग देऊ !

३४०. घडी में तोला घडी में माशा – घटकेत तोळा घटकेत मासा (प्रकृति, स्वभाव)

३४१ घर की आधी भली, बाहर की सारी कुछ नहीं – घरची आर्धी चांगली, बाहेरची सबंध नको आळशाला सगळेच कठीण

३४२ घर आये कुत्ते को भी नहीं निकालते – घरी आलेल्या कुत्र्यालासुद्धा हाकलीत नाहीत अतिथी सत्कार केला पाहिजे

३४३ घर का जोगी जोगडा, आन गाँव का सिद्ध – घरचा योगी जोगडा, परगावचा सिद्ध पुरुष पिकते तेथें विकत नाही

३४४. घर का भेदी, लंका ढावे – घरचा फितुर, लंकेचा नाश झाला घरचा म्हाली (न्हावी) घर खाली घरभेद्या राष्ट्राचा नाश करितो

३४५ घर की खाँड किरकिरी लागे चोरी का गुड मीठा मीठा – घरची साखर आळणी लागते चोरीचा गूळ गोड गोड घरचीचे मिठवणी, बाहेरचीचे मीठ्ठापाणी.

३४६ घर की मुर्गी दाल बराबर – घरची कोंबडी वरणासमान घरचीचे ते मिठवणी, बाहेरचीचे मिठ्ठापाणी

३४७ घर के पीरो को तेल का मलिदा – घरच्या पीरांना (पितरांना) तेलातले पक्वान्न घरच्या देवाला कसला तरी नैवेद्य

३४८ घर घोडा नकास मोल – कोंबडीची अंडी फुटून पिले बाहेर पडण्याच्या आधीच त्याची मोजदाद करणे

३४९ घर खीर तो बाहर खीर – घरी खीर तर बाहेर खीर घरी सुख तर बाहेर चैन

३५० घर घर यही लेखा – घरोघरी हाच हिशेब घरोघरी त्याच परी

३५१ घर घर शादी घर घर गम – घरोघरी आनंद. घरोघरी दु ख

३५२ घर में चिराग नहीं, बाहर में मसाल – घरात नाही पती बाहेर मशाळ ! घरी शिमगा बाहेर दिवाळी

३५३ घर मे दिया तो मंदिर में दिया – घरात दिवा तर मंदिरात दिवा आधी प्रपंच करावा नेटका। मग घ्यावे परमार्थ-विवेका

३५४ घर में नहीं दाने, बुढिया चली भुनाने – घरात नाही दाणे; म्हातारी चालली लाह्या फोडून आणायला भट्टीवर घराला नाही कौल अन रिकामा डौल

३५५ घी कहाँ गया खिचडी में – तूप काय झाले ? खिचडीत गेले (आपली वस्तु आपल्याच उपयोगी पडल्यास म्हणतात )

३५६ घी खाया बापने, सूंघो मेरे हाथ – वडिलांनी तूप खाल्ले वास घ्या माझ्या हाताचा ।। सांगे वडिलाची कीर्ति तो एक मूर्ख ।।

३५७. **घी भी खाओ और पगड़ी भी रखो** – तूप खा नि पगडीही साभाळा आव सामाळून खर्च करावा (कर्ज काढून नव्हे)

३५८. **घोडा घाससे यारी करे तो खाये क्या** – घोडा गवताशी मैत्री करील तर पोटाला काय खाईल ?

३५९ **घोडा घोडसाल मे ही बिकता है** – घोडा तवेल्यातच विकला जातो योग्य ठिकाणी वस्तूस मोल यते

३६० **घोडे का गिरा सँभल सकता है, नजरोंका गिरा नहीं सँभलता** – घाड्यावरून घसरला तर सावरतो, मनातून उतरला तर सावरत नाही.

३६०अ **घोडे का सवार भी गिरता है** – नेमबाजाचीसुद्धा एकादे वेळी गोळी हुकते

३६१ **घोडो का घर कितनी दूर** – घोड्याचे घर किती लाब काम करणाऱ्याला वेळ लागत नाही

३६२ **घर के देव ललॉय, बाहर के पूजा माँगे** – घरातल्या देवाकडे अनवधान आणि बाहेरचे देव पूजा इच्छितात

## च

३६३ **चंदन की चुटकी भली गाडीभरा न काठ** – चिमूटभर चदन बरवे, गाडीभर लाकडा काय करावे ? चिमूटभर कथा नि कठाळभर नमन

३६४ **चक्की में कौर डालोगे तो चून पाओगे** – जात्यात वैरण घातली तर मरडा मिळेल पेरले तसे उगवेल

३६५ **चढते बरसे आर्द्रा, उतरत बरसे हस्त, कितनो राजा डॉड ले, आनद रहे गृहस्थ** – प्रारभी पडती आर्द्रा, अती कोसळे हस्त, राजा कितीही मागो, सुखी राहे गृहस्थ

३६६ **चना ओर चुगल मुँह लगा छूटता नही** – चणे नि चुगली, जर एकदा तोंडी लागली, तर सुटता सुटेना

३६७. **चमगीदडो के घर मेहमान आये, हम भी लटके, तुम भी लटको** – वटवाघुळाघरी पाहुणे आले, आम्ही उलटे लटकतो, तुम्हीही लटका वेळ पडेल तसे वागावे

३६८ **चमडी जाय, पर दमड़ी न जाय** – अगाचे कातडे जाईना का, पण दमडी जाता कामा नये

३६९ **चलती का नाम गाडी है** – चालते तिचे नाव गाडी आहे

(गाडी=(१) गाडी (२) गाडलेली)
चलती को गाडी कहे। कटे दूध को खोया।
रगी को नारगी कहे। देख कबीरा रोया।

३७० **चलती गाडी में रोडा अटकाना** – चालत्या गाड्याला खीळ घालणे (रोडा – जळक्या विटेचा तुकडा)

३७१ **चाँद को भी ग्रहण लगता है** – चद्रालाही ग्रहण लागते मोठ्यानाही कलक लागतो

३७२ **चाकरी में नाकरी क्या** – चाकरीत ना करी कुठले। नोकरी पत्करली खरी, मग त्यात आवड-निवड नाही

३७३ चार दिनकी चाँदनी फिर अधेरी रात – चार दिवसाचे चादणे, पुढें अधेरी रात्र चार दिवस टुरटुर पुढे निजे घाराघूर नऊ दिवसाचें आश्चर्य (इ)

३७४ चिकने घडेपर पानी नहीं ठहरता – गुळगुळीत घड्यावर पाणी ठरत नाही. पालथ्या घड्यावर पाणी

३७५ चिकने मुँह को सब चूमते हैं – गुलगुलीत मुखाचे सगळेच चुंबन घेतात. थोरामोठ्यापुढें सगळेच गोडा घोळतात

३७६. चिरागतले अँधेरा – दिव्याखाली अंधार

३७७ चिराग में बत्ती और आँख में पट्टी – दिव्यात वात नि डोळ्यावर पट्टी ! समई लागली नि झोप आली !

३७८ चींटी चाहे सागर-थाह – मुंगी समुद्राचा ठाव पाहणार ! आवाक्याबाहेरचे काम !

३७९ चील के घोसले में मास कहाँ – घारीच्या घरट्यात मास कुठले ? एकादशीच्या घरी शिवरात्र

३८० चुपडी और दो दो – तुपानें माखलेली (पोळी) नि दोन दोन (हव्यात) सगळीकडून लाभ पाहिजे ! आखुडशिंगी बहुदुधी !

३८१ चुल्लू में उल्लू, लोटे में गडगप – चुळकाभर घेतली की चढली धुंदी, ताब्याभर घेतली तर पूर्ण बेशुद्धि (निशा करणाऱ्याना म्हणतात)

३८२. चूल्हा फूंकना और डाढी रखना – चूल फुकायची नि दाढी ठेवायची दोन्ही गोष्टी साधत नाहीत

३८३ चूल्हे की है न चक्की की – चुलीची न जात्याची ससाराला निरुपयोगी स्त्री

३८४ चूहा मारकर गोबर सुंघाना – आधी उंदीर मारायचा नि मग पापप्रक्षालनार्थ गोमय हुंगायचे ! आधी बायकोचे डोके फोडायचे नि मग त्याला प्लॅस्टर करायचे (इं)

३८५ चूहे का बच्चा बिलही खोदता है – उंदराचे पिल्लू बिळच खोदते मूळ स्वभाव जात नाही "स्वभावो दुरतिक्रम"

३८६ चूहे के चामसे कहीं नगाडे मढे जाते है ? – उंदराच्या कातड्याने कुठे नगारे मढतात ? उपऱ्या वस्त्राने लाज झाकत नाही

३८७ चूहों की मौत बिल्ली का खेल (चिडियो की मौत गँवार की हँसी) – माजराचा खेळ उंदराचें मरण तुमचा खेळ होतो पण आमचा जीव जातो

३८८ चैत में हुई फसल तैयार, काट बाध कर लाओ पास – चैत्री झाले पीक तयार, कापा, मळा नि आणा घरा

३८९ चोट्टी कुतिया जलेबियो की रखवाली – चोरटी कुत्री जिलब्या राखते ! चोराच्या हाती जामदार-खान्याच्या किल्ल्या ! !

३९० चोर का साथी गिरहकट – खिसेकापू चोराचा दोस्त ! एकाच पखाचे पक्षी एकत्र येतात (इ)

३९१ चोर की दाढी में तिनका – चोराच्या दाढीत काडी (गवताची) चोराला वाटते माझ्याबद्दल चर्चा चालू आहे त्याच्या बिचकण्यानेच तो ओळखला जातो

३९२. चोर के पैर नहीं होते – चोराला पाय नसतात अपराध्याला आधार नाही.
३९३ चोर के ख्वाब में बुचके – चोराच्या स्वप्नातही बोचकीच (हंडबॅग्ज्) दिसतात
३९४ चोर चोर मौसेरे भाई – चोर चोर मावस भाऊ उदराला माजर साक्षी.
३९५ चोर चोरी से गया तो क्या हेरा फेरीसे गया – चोरानें चोरी करण्याचें सोडले तरी तो उलथापालथ करीलच
३९६ चोरपर मोर – चोरावर मोर
३९७ चोर से कहो चोरी करो, शाहसे कहो जागते रहो – चोराला म्हणावें चोरी कर आणि सावाला म्हणे जागा राहा !
३९८. चोरी का धन मोरी में जाय – चोरीचा माल मोरीत वाईट रीतीनें मिळविलेल्या पैशाचा क्वचितच उत्कर्ष होतो.
३९९ चौवे गये छब्वे बनने; दुब्वे ही रह गये – (चौबे–चार विद्या जाणणारा दुबे–दोन विद्या जाणणारा) चाराचे सहा करायला गेलो तो दोनच झाले (चौबे व दुबे ही आडनावें आहेत)
४०० चुटकी काटना न बकोटा भराना – कोणाला टोचून बोलायचे नाही किंवा बोचेल असे निंदात्मक बोलायचें नाही

## छ

४०१. छछूंदर के सिर में चमेली का तेल – चिचुंद्रीच्या डोक्याला चमेलीचें तेल. भिकाऱ्याला भरजरी अगरखा
४०२ छटाक चून चौबारे रसोई – छटाक कण्या नि ओसरीवर स्वयपाक छोटया गोष्टीचें मोठें आडबर
४०३ छातीपर बाल नही, भालू से लढाई – छातीवर केस नाही नि अस्वलाशीं स्पर्धा गाडीत नाही गू नि कावळचाला आमत्रण
४०४ छुरी खरबूजेपर गिरी तो खरबूजे का जर्र; खरबूजा छुरीपर गिरा तो खरबूजे का जर्र – सुरी खरबुजावर पडली काय नि खरबूज सुरीवर पडलें काय, फुटायचें खरबूजच ! !
४०५ छोटे सिंग और छोटी पूंछ, ऐसे को लेलो बेपूछ – आखुडशिंगी, लहान शेंपूट असा बैल विकत घ्या गुपचूप (कोणाचें मत न घेता)
४०६ छोटे मूंह बडी बात – लहान तोंडी मोठा घास
४०७ छोड़े खाद खेत गहराई, तब खेती का मजा उठायी – खत घाला, खोल नागरा मग शेतीचा आनद लुटा
४०८ छोड़े गॉव से नाता क्या – एकदा गाव सोडले, मग नाते कसले ? ज्या गावी जायचे नाही त्याची वाट कशाला पुसावी ?

## ज

४०९ जग में देखते ही का नाता – जीव आहे तोवर नाते
४१० जड काटते जायें, पानी देते जायें – मूळ कापीत जायचे, पाणी देत राहचचे, वरून गोड आतून विष
४११ जने जने की लकडी, एक जने का बोझ – प्रत्येकाचे एक एक लाकड, एकजणाची मोळी होते

४१२. जब चने थे तब दाँत न थे, जब दाँत भये तब चने नहीं – चणे होते तेव्हा दात नव्हते आता दात आहेत तर चणे नाहीत

४१३ जब तक जीना तब तक सीना – जोवरि जगणे, तोवरि शिवणे जगायचे तोंवर उद्योग केलाच पाहिजे

४१४ जब अपनी लाज उतार ली तब दुसरे की उतरने में क्या लगता है – ज्याने स्वतःची लाज सोडली तो दुसऱ्याची फटफजिती करायला काय लाजणार ?

४१५ जब तक सांसा तब तक आसा – जोवरि श्वास तोवरि आस

४१६. जब दात न थे तब दूध दियो, जब दात दिये तब अन्न न दे है – दात नव्हते तेव्हा दूध दिले, आता दात दिले तर अन्न देत नाही

४१७ जब देता है तो छप्पर फाड़कर देता है – (ईश्वर) देतो तेव्हा घराचे छप्पर काढून त्यातून देतो (भाग्य उघडले की मातीचे सोने होते)

४१८ ज़बरदस्त का ठेंगा सरपर – जबरदस्ताचा आंगठा डोक्यावर जबरदस्ताचे खाद्यावर

४१९ ज़बरदस्त मारे और रोने न दे – बलवान् मारतोच मारतो आणि वर रडूही देत नाही अन्यायी शासक अन्याय करी। ओरड केली तर तुरुग भरी ।।

४२० ज़बरदस्त सब का जमाई – बलवान सर्वांचा जावई

४२१ ज़बान ही हाथी चढावे, जबान ही सिर कटावे – जीभच हत्तीवर मिरविते, जीभच शिरच्छेद करविते

४२२. ज़मात करामात –संघशक्तीने सर्व घडते

४२३. जर, जमीन, ज़न झगडे की जड है – जर (सोने) जमीन व जन (स्त्री) हे, भांडणाचे मूळ कनक नि कांता अरिष्टास कारण

४२४ जर है तो नर है नहीं तो पछी बेपर है (पूरा खर है) – जर (सोने) आहे तर नर आहे, नाहीतर नुसता पखविहीन पक्षी आहे [खर (गाढव) आहे] "सर्वे गुणाः कांचनमाश्रयन्ते"

४२५ जल की मछली जल में ही भली – पाण्यातला मासा पाण्यातच भला

४२६ जल में रहना, मगर से बैर – पाण्यात राहून मगराशी वैर करायचे! पाण्यात राहून माशाशी वैर रोममध्ये राहून पोपशी वैर करणे म्हणजे जगणे कठीण करणे आहे

४२७ जस दूल्हा तस बनी बराता – जसा नवरदेव तशी वरात (आपापल्या योग्यते-प्रमाणे) "यथा यक्षस्तथा बलि."

४२८ जस बाप तस बेटा – बाप तसा बेटा व कुंभार तसा लोटा

४२९ जहाँ जहाँ चरण पडे सन्तन के, बँटाधार करें – (या) संताचे पाय जेथे लागतात तेथे समृद्धीचे काय विचारावे (हे पांढरे पाय आले की सर्वनाश झालाच या हेतूने म्हणावयाची म्हण)

४३० जहाँ की मिट्टी वहीं ले जाती है – जेथली माती तेथेच घेऊन जाते जेथे मरण असेल तेथेच दैव नेते

४३१. जहाँ गुड होगा वहीं चीटियाँ (मक्खियाँ) होगी – गूळ असेल तेथे मुंगळे (किंवा माश्या) असायचेच

४३२ जहाँ फूल है वहाँ काँटा भी है – जेथे फूल आहे तेथे काटाही आहे

४३३ **जहाँ चार बासन होंगे वहाँ खटकेंगे भी** – जेथे चार भांडी असतील तेथें ती एकमेकाना लागायचीच

४३४ **जहाँ देखे तवा परात, वहाँ गुजारे सारी रात** – जेथें देखे तवा परात तेथेंच काढी सारी रात (रात्र) दिसला गुळाचा खडा की चिकटलाच तेथे मुगळा

४३५ **जहाँ मुर्गा नहीं होता वहाँ क्या सवेरा नहीं होता** – जेथें कोंबडा नसेल तेथें काय सकाळ होत नाही ? कोंबडा झाकल्याने उजाडायचे थोडेच राहते !

४३६. **जाकी रही भावना जैसी, प्रभु मूरत देखी तिन तैसी** – ज्याची जशी भावना असे। त्याला तसे प्रभुरूप दिसे

४३७ **जाके (जिस के) पाँव न फटी बेवाई, सो क्या जाने पीर पराई** – ज्याच्या पायाला चिखल्या झाल्या नाहीत, त्याला दुसऱ्याचें दु ख काय कळणार ? ज्याला स्वत ला परिश्रम सोसावे लागत नाहीत व अडचणी सोसाव्या लागत नाहीत, त्याला परदु खाची कल्पना येत नाही "परदु ख शीतळ" ज्याला कधीच जखम झाली नाही त्यानें कोणाच्या अंगावर ओरखडा पाहिला तर तो त्याची टिंगल करतो (इ ) He jests at scars who never felt a wound

४३८ **जाको राखे साइयाँ मार न सक है कोय (बाल न बाँका कर सके जो जग वैरी होय)** – ज्याचें रक्षण परमेश्वर करितो त्याला कोणी मारू शकत नाही (सर्व जग जरी त्याचे वैरी असलें तरी त्याचा केससुद्धा कोणी वाकडा करू शकत नाही ) देव तारी त्याला कोण मारी ?

४३९ **जादू वह जो सिरपर चढकर बोले**– जादू (सामर्थ्य) तीच खरी जी प्रकटपणे प्रभाव दाखविते कोणाचीही लाडीलवाडी न करिता आपल्या सामर्थ्यावर करून दाखविणे

४४० **जान न जाय निशाचर माया** – राक्षसाची माया काही कळत नाही केव्हां काय होईल काही नेम नाही

४४१ **जान बची, लाखो पाये** – प्राण वाचले, लाखो रुपये मिळविले !

४४२ **जान मारे बनिया, पहचान मारे चोर** – ओळखीच्या गिऱ्हाइकाला वाणी लुबाडतो ओळखीचा चोर जीवे न सोडी

४४३ **जानवरो में कौआ और मनुष्यो में नौआ** – पक्ष्यात काऊ नि माणसात न्हाऊ

४४४ **जाना अपने वस, आना पराये वस** – जाणे आपल्या हाती पण परतणे दुसऱ्याच्या हाती

४४५ **जाय लाख रहे साक** – लाखाची हानि झाली तरी पत जाता कामा नये "अपि स्वदेहात्किमुतेंद्रियार्थात्। यशोधनाना हि यशो गरीय "

४४६ **जितना गुड डालोगे उतनाही मिठा होगा** – जितका गूळ घालावा तितके गोड होत जातें

४४७ **जितनी चादर देखो उतने ही पैर पसारो** – जेवढी चादर असेल तेवढेच पाय पसरा अंथरूण पाहून पाय पसरावे

४४८ **जितने मुँह उतनी बाते** – जितकी तोडें तितक्या गोष्टी

४४९. **जिस का ब्याह उसी के गीत** – ज्याचे लग्न त्याचेसाठी गाणी जी मूर्ति असेल, तिची स्तुति करितात

४५०. **जिस की उतर गई लोई उस का क्या करेगा कोई** – ज्याच्या डोक्यावरची धावळी खाली पडली, त्याचे कोण काय करणार ? एक लाज टाकिली जेणे । त्याचे काय करावें कोणे ।।

४५१ **जितने नर उतने बुद्धि** – माणसामाणसाची बुद्धि वेगवेगळी असते

४५२ **जिस का दु:ख वही जानता है** – जावे त्याच्या वशा तेव्हा कळे । जोडा वापरणाऱ्यालाच तो कुठें बोचतो (टोचतो) हे कळते.

४५३ **जिस की बंदरी वहीं नचावे** – ज्याची वादरी तोच नाचवू जाणे

४५४. **जिस की लाठी उस की भैंस** – ज्याची लाठी त्याची म्हैस वळी तो कान पिळी ज्याचे हाती ससा तो पारधी

४५५ **जिस के पास नहीं पैसा वह भला मानस कैसा** – ज्याच्या जवळी पैसा नसे, त्याला सज्जन म्हणावे कैसे ?

४५६ **जिन खोजा तिन पाइयाँ । गहरे पानी पैठ ।**
**तिन बपुरा क्या पाइयाँ । रहे किनारे बैठ.**
पाण्याच्या तळाशी जाणाऱ्याला अपेक्षित वस्तु मिळते किनाऱ्यावर बसणाऱ्याला काय मिळणार ? दोष हे गवताच्या काडचाप्रमाणे समुद्राच्या पाण्याच्या पृष्ठभागावर तरगतात पण ज्याला सत्याचा शोध करावयाचा आहे, त्याला बुडी मारून पाण्याच्या तळाशीच जाणे भाग आहे.

४५७ **जिस के हाथ लोई, उस का सब कोई** – ज्याचे हाती उडा (पिठाचा गोळा) असे, त्याच्या सेवेला प्रत्येकजण असे धनधान्य ज्याच्यापाशी । उभे सर्व त्याच्या दाराशी मृदगो मुखलेपेन करोति मधुरध्वनिम् ।।

४५८ **जिस डालपर बैठे, उसी को काटे** – ज्या फांदीवर बसावे, तिलाच कापावें.

४५९ **जिस बरतन में खाना उसी में छेद करना** – ज्या भाड्यात जेवावे, त्यालाच भोक पाडावे खाल्ल्या घरचे वासे मोडणे (मोजणे)

४६० **जीभ भी जली स्वाद भी न आया** – जीभही भाजली नि स्वादही नाही. तोंडालासुद्धा लागलें नाही चवही कळली नाही

४६१ **जूं की डर से गुदडी नहीं फेंकी जाती** – उवाच्या भीतीनें गोधडी कुठे फेंकून देतात का ? " का न सदन बाधावे की त्यात पुढे विळें करिल घूस ।।

४६२ **जूठा खाय मीठे के लालच** – उष्टें खावें गोडाच्या लोभाने उष्टें खातो तुपासाठी

४६३ **जे न मित्र दुख होहि दुखारी, तिनहि विलोकत पातक भारी** – मित्र सकटी कामा नये । त्याचे मुखावलोकन करू नये ।

४६४ **जेहि के पॉव न भई बेवाई सो क्या जाने पीर पराई** – दुसऱ्यावर काय भार पडला आहे याची स्वानुभवाविणे कोणाला कल्पना नसते

४६५ **जैसा आया वैसा गया** – ज्या तऱ्हेनें मिळविले, त्याच तऱ्हेनें गमावलें. वाईट मार्गानें मिळविलें ते वाईट मार्गांत खर्च झालें

४६६ **जैसा दाम वैसा काम** – जसा दाम तसे काम.

४६७ **जैसा देश वैसा भेष** – देश तसा वेश

४६८ **जैसा राजा वैसी प्रजा** – यथा राजा तथा प्रजा जसा शास्ता तशी जनता जसे मत्री तसे सत्री (नोकर – पहारेकरी)

४६९ **जैसी काली कामरी चढे न दूजो रग** – काळ्याला दुसरी रगछटा घेता येत नाही

४७० जैसी तेरी तिल चावरी, तैसे मेरे गीत – जशी तुमची तिळातांदुळाची खिचडी तसे माझे गाणे. जशी देणावळ तशी वुणावळ
।। ये यथा मां प्रपद्यन्ते । तांस्तथैव भजाम्यहम् ।।
४७१ जैसी बहे बयार, पीठ तब तैसी कीजै (दीजे) – वारा वाहील तशी पाठ द्यावी
४७२ जैसे मियां काठ के वैसे सन की दाढी – जसे मियां लाकडी, त्यांना अंबाडीची दाढी चांभाराच्या देवाला खेटराची पूजा.
४७३ जैसे साँपनाथ वैसे नागनाथ – जसे सापनाथ तसे नागनाथ एका माळेचे मणि.
४७४ जो कहूँ मघा मे वरसे जल, सब नाजों में होगा फल – मघा (नक्षत्रा) चा पाऊस जर पडेल, तर सर्व पीक चांगले भरभरेल
४७५ जो गरजते हैं वे बरसते नहीं – जे (मेघ) गरजतात ते जलवर्षाव करीत नाहीत गर्जेल तो पडेल काय ? बोलेल तो करील काय ? भुकरे कुत्रे क्वचितच चावते
४७६. जो चढ़ेगा सो गिरेगा – चढेल तो पडेल
४७७ जो ज्यादा करीब, सो ज्यादा रकीब – जो अगदी आपला, त्यानेच गळा कापला !
४७८ जो बोले सो कुंडी खोले – (युक्ति) सांगेल त्यानेंच कडी उघडावी " पाटीलबोवा ! लग्न करा तर म्हणे तुम्हीच बायको व्हा "
४७९ जोरू टटोले गठरी, माँ टटोले अँतडी – वायको चाचपते गठडी आई चाचपते आतडी. (अंत करण)
४८० जो हल जोते खेती वाकी, और नहीं तो जाकी ताकी – " नांगर चालवी शेती त्याची । नाहीतर मग प्रत्येकाची ।
४८१ ज्यो केरा के पात में पात, पात में पात, त्यों ज्ञानी की बात में बात, बात में बात – जसे केळीच्या पानात पान तसे ज्ञानी माणसाच्या शब्दाशब्दात ज्ञान
४८२ ज्यो ज्यो भीजे कामरी त्यों त्यो भारी होय – घोंगडी जो जो भिजे, तो तो जड ओझें
४८३ ज्यो नकटे को आरसी होत दिखावे क्रोध – नकट्याला दाखविता आरसा; तो क्रोधें होय पिसा

## झ

४८४ झूठ के पाँव कहाँ (नहीं होते) – असत्याला पाया नाही खोट्याला कुठले पाय ?
४८५ झूठे का मुँह काला; सच्चे का बोलबाला – असत्याचे तोंड काळे, खऱ्याचा जयजयकार
४८६ झोपडी में रहे महल का ख्वाब देखे – झोपडीत राहतो स्वप्न प्रासादाचे पाहतो

## ट

४८७ टका हो जिस के हात में वह बड़ा ही जात में – पैसा ज्याचे हातात तो श्रेष्ठ आपल्या जातीत

